# शुद्धिपत्र.

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १५ | २८ | सवर्ज्ञः | सर्वज्ञः |
| ३० | ८ | श्रुति | श्रुतिः |
| ३१ | १२ | ,, | ,, |
| ३२ | ८ | श्रुतिभ्यो- | श्रुतिभ्योऽ- |
| ,, | ३० | विद्वान् सांगतात म. | विद्वान् सांगतात'मनु' |
| ३४ | ३ | जलदबुद्बद० | जलबुद्बुद० |
| ५० | ५ | अविद्याग्रर्थि | अविद्याग्रंथिं |
| ५६ | २६ | स्वस्ति व पराय | स्वस्ति वः पराय |
| ५७ | ५ | ०न्तःकरणापाध्य० | ०न्तःकरणोपाध्य० |
| ६२ | २९ | अविद्यादिकांचा | अविद्यादिकांचा |
| ६४ | १३ | ०रस्मदगाचरः | ०रस्मदगोचरः |
| ८७ | १३ | ते ब्रह्म लोकेषु | ते ब्रह्मलोकेषु |
| ८८ | १७ | भवितर्मर्हति | भवितुमर्हति |

॥ ॐ तत्सत् ब्रह्मणे नमः ॥

# मुण्डकोपनिषद्भाष्यार्थ.

[ मूळ श्रुति, अर्थ, शांकरभाष्य, भाष्यार्थ, स्पष्टीकरण यांसह. ]

---

संपादक व प्रकाशक

आचार्यभक्त–विष्णु वामन बापटशास्त्री.

---

आवृत्ति दुसरी.

---

चैत्र शुद्ध ९. शके १८४७–सन १९२५.

# प्रस्तावना.

—:*:—

या ग्रंथाची पहिली आवृत्ति संपल्यामुळें ही दुसरी आवृत्ति आज प्रसिद्ध करीत आहों. यांत क्वचित् थोडा बदल केला आहे. छपाईविषयीं शक्य तितकी काळजी घेतली आहे. सुबोध उपनिषत्संग्रहांत या उपनिषदाचें स्वतंत्र सिंहावलोकन केलेलें असल्यामुळें प्रथमावृत्तींतील प्रस्तावनेंत दिलेला ग्रंथसारांश येथें घेतला नाहीं. पुढें सविस्तर अनुक्रमणिका मात्र दिली आहे. तिच्यावरून प्रथमावृत्तींतील ग्रंथसारांशाचेंहि कार्य सहज होईल व पृष्ठशः विषयांचा अनुक्रमहि समजेल. मुंडकोपनिषद् हें अथर्वणवेदाचें मंत्रोपनिषद् असून त्याचे तीन मुंडक व प्रत्येकीं दोन, असे सहा खंड आहेत. प्रश्नोपनिषद् हें याचेंच व्याख्यानात्मक ब्राह्मण आहे. आचार्यांनींहि–पुढें पृ. ७४–'वक्ष्यति च न येषु जिह्ममनृतं न माया चेति' असा प्रश्नोपनिषदाच्या पहिल्या प्रश्नांतील शेवटच्या वाक्याचा भविष्यत्कालानें उल्लेख करून हें सुचविलें आहे. प्रश्नोपनिषद्भाष्याच्या आरंभीं तर आचार्यांनीं त्याचा स्पष्टच उल्लेख केला आहे. म्हणून आचार्यांच्या संप्रदायांतील संन्यासी वेदान्तविद्यार्थ्यांना प्रस्थानत्रयीचा पाठ सांगतांना ईश, केन व कठ हीं तीन उपनिषदें होतांच प्रथम मुंडकभाष्य सांगून नंतर प्रश्नभाष्य सांगतात. असो; आमच्या या अल्पकृतीनें सर्वान्तर्यामी आचार्य प्रसन्न होवोत व वेदान्तार्थजिज्ञासु तिचा उपयोग करोत, अशी शुभ इच्छा व्यक्त करून ही प्रस्तावना संपवितों.

पुणें २७० सदाशिव पठ,
चैत्र शु. १. श. १८४७.

वा. वि. बापट.

# अनुक्रमाणिका.



विद्येनें प्राप्य अशा संसारगति येथवरच ३१; 'ब्रह्मलोकप्राप्ति हाच मोक्ष' या म्हणण्याचें निरसन ३२; 'परीक्ष्य लोकान्०' मंत्रानें कर्मसंपादित फलांचें परीक्षण करून ब्राह्मणानें विरक्त व्हावें व ब्रह्मनिष्ठ गुरूला शरण जावें असा उपदेश, गुरूपसदनविधीचा नियम ३३-३५; 'तस्मै०' इत्यादि मंत्रानें विद्वान् गुरूनें उपसन्न झालेल्या अधिकारी शिष्या ब्रह्मविद्या सांगावी, असा नियम ३६.

—मुं. २. खं. १. [३७–५०] संसार हें अपर विद्येचें कार्य, त्यांतील अक्षर ब्रह्म हें सार सांगण्यासाठीं पुढील ग्रंथाचा आरंभ, कर्मफलरूप अपर विद्याविषय आपेक्षिक सत्य व परविद्याविषय मोक्ष हें निरपेक्ष सत्य, अविद्याविषयत्वामुळें ब्रह्मभिन्न सर्व मिथ्या, अत्यंत परोक्ष ब्रह्म साक्षात् विज्ञात व्हावें म्हणून 'यथा सुदीप्तात्०' इत्यादि मंत्रानें सदृष्टान्त ब्रह्मापासून जगदुत्पत्ति-प्रलयांचें प्रतिपादन ३७-३८; ब्रह्मालाच जगाच्या उत्पत्ति-प्रलयांचें निमित्तत्व, ब्रह्माच्या वास्तविक स्वरूपाचें 'दिव्यः०' इत्यादि मंत्रानें वर्णन, त्यांतच अविद्याबीजभूत अक्षरांहून या अक्षरब्रह्माचें परत्वकथन, ३९-४१; 'एतस्माज्जायते०' या मंत्रानें अक्षराच्या ठिकाणीं प्राणादि कसे नसतात त्याचें वर्णन, ब्रह्मापासून प्राणादिकाची उत्पत्ति ४२-४३; 'अग्निर्मूर्धा०' इत्यादि मंत्रानें विश्वरूपवर्णन ४४; 'तस्मादग्निः०' इत्यादि पांच मंत्रांनीं अक्षरापासूनच चराचर सृष्टीच्या उत्पत्तीचें कथन ४५-४८; 'पुरुष एव०' इत्यादि मंत्रानें पुरुषच हें सर्व आहे, बुद्धिगुहेंत असलेल्या त्याला जो जाणतो तो जीवदवस्थेंतच अविद्याग्रंथीचा नाश करितो ४९-५०.

—मुं. २. खं. २. [५०–६६] रूपादिरहित अक्षर ब्रह्म दुर्ज्ञेय, म्हणून 'आविः संनिहितं०' या मंत्रानें त्याचेंच प्रतिपादन ५०; 'त्यालाच जाणा' असा उपदेश ५१, 'यदर्चिमत्०' इत्यादि मंत्रानें त्याचेंच वर्णन व 'त्याला वेध करावा' असा उपदेश ५२, 'धनुर्गृहीत्वा०' या मंत्रानें वेधाचा प्रकार ५३, 'प्रणवो धनुः०' इत्यादि स्पष्टीकरण ५४, 'यस्मिन्द्यौः०' या मंत्रानें 'सर्वाधार ब्रह्मालाच जाणा, अन्य वाणी सोडा' असा उपदेश ५५-५६, 'अरा इव०' या मंत्रानें हृदयामध्यें बहुधा संचार करणाऱ्या आत्म्याचें ओंकारानें ध्यान करण्याचा उपदेश व गुरूचा शिष्याला निर्विघ्नपणें परतीरास जाण्याविषयीं आशीर्वाद ५७, 'यः सर्वज्ञः०' या मंत्रानें अपरब्रह्माचें वर्णन व क्रममुक्ति हें फल देणारें सगुण ब्रह्माचें हृदयकमलांत ध्यान करण्याचा उपदेश, ५८-५९, 'भिद्यते हृदयग्रंथिः०' या मंत्रानें परमार्थज्ञानाचें फल, हृदयग्रंथीच्या उच्छेदाचा प्रकार, आत्मा निर्विकार, त्यामुळें तो हृदयग्रंथीचा आश्रय नव्हे, बुद्धीच्याच आश्रयानें ग्रंथि रहातो, अविद्या-काम-कर्मादिकांचा अहंकाराशीं संबंध, म्हणूनच त्यांना

व्यावहारिकत्व ६०-६२, ‘हिरण्मये०’ इत्यादि तीन मंत्रांनीं उक्तार्थाचाच संक्षेप ६३, ‘अक्षरब्रह्माला सूर्यादि कोणी प्रकाशित करीत नाहीं, तर अक्षराच्या प्रकाशानेंच सर्व ज्योति प्रकाशित होतात’ असें ‘न तत्र सूर्यो०’ इत्यादि मंत्रानें व्याख्यान ६४, ‘ब्रह्मै-वेदं०’ या मंत्रानें उक्तार्थाचा उपसंहार ६५-६६.

—मुं. ३. खं. १. [ ६७–८१ ] दुसऱ्या प्रकारें तत्त्वनिर्धारण करण्यासाठीं ‘द्वा सुपर्णा०’ इत्यादि मंत्राचा उपन्यास ६८, ‘समाने वृक्षे०’ या मंत्रानें त्या दोन पक्ष्यांतील एक संसारी व दुसरा असंसारी, त्याच्या ज्ञानानेंच शोकराहित्य ६९-७०, ‘यदा पश्यः०’ हा मंत्रहि पूर्वोक्त अर्थ सविस्तर सांगतो ७१, ‘प्राणो ह्येष०’ या मंत्रानें ज्ञानाचें फल ७२; अग्निहोत्रादि कर्म व ब्रह्मविद्या यांच्या समुच्चयाची सप्रमाण अनुपपत्ति ७३, आत्मज्ञानाचीं ‘सत्येन०’ या मंत्रानें सत्यादि साधनें ७४, ‘सत्यमेव जयति०’ या मंत्राचें व्याख्यान ७५-७६, ‘बृहच्च०’ या मंत्रानें ब्रह्मतत्त्वाचें वर्णन ७७, ‘न चक्षुषा०’ या मंत्रानें त्याच्या साक्षात्काराचें असाधारण कारण ७८, ‘एषोऽणु आत्मा०’ या मंत्राचें व्याख्यान ७९, ‘यं यं०’ या मंत्रानें सर्वात्म्याला आत्मत्वानें जाणलेल्या विद्वानाला सर्वप्राप्तिरूप फल ८०-८१.

—मुं. ३ खं. २. [ ८१–९३ ] जे निष्काम मुमुक्षु ब्रह्मज्ञाची सेवा करितात तेहि शरीरबीजाचें अतिक्रमण करितात असें ‘स वेद०’ इत्यादि मंत्रानें व्याख्यान ८१, मुमुक्षूला कामत्याग हेंच प्रधान साधन आहे, असें ‘कामान् यः०’ या मंत्रानें श्रुति दाखविते ८२, ‘नायमात्मा०’ या मंत्रानें प्रवचनादिकांनीं आत्मलाभ होत नाहीं तर केवल आत्मप्रार्थनेनेंच तो होतो ८३-८४, ‘नायमात्मा बलहीनेन०’ या मंत्रानें आत्मप्राप्तीचा उपाय व फल ८५, ‘संप्राप्य०’ या मंत्रानें विद्वान् ब्रह्मामध्यें प्रवेश कसा करितो तो प्रकार ८६, ‘वेदान्तविज्ञान०’ या मंत्रानें ब्रह्मज्ञांची सोपपत्तिक ब्रह्मप्राप्ति ८७-८८, ‘गताः कलाः०’ या मंत्रानें मोक्षसमयीं प्राणादि कलांचा आपापल्या कारणांत लय, अविद्यादि सर्व कार्य ब्रह्मच, त्याविषयीं उपपत्ति ८९, ‘यथा नद्यः०’ या मंत्रानें विद्वानाची सदृष्टान्त ब्रह्मप्राप्ति, ‘स यो०’ या मंत्रानें विद्वानाचें अवान्तर व मुख्य फल, त्याविषयीं ‘क्रियावन्तः०’ या ऋचेचें प्रमाण, ज्यानें शिरोव्रत आचरिलें आहे त्यालाच ब्रह्मविद्या सांगावी असा संप्रदायविधि ९०-९१, ‘तदेतत्०’ या मंत्रानें ग्रंथाचा उपसंहार ९२-९३.

# मुण्डकोपनिषद्भाष्यार्थ

### [मूळ श्रुति, अर्थ, शांकरभाष्य, स्पष्टीकरण व अवतरणें यांसह भाष्यार्थ.]

**ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।**
**स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥**
**॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

**शांतीचा अर्थ**—अहो देवांनो, आम्हीं कानांनीं भद्र—कल्याण—शुभवचन ऐकावें आणि यागास समर्थ होऊन आम्हीं नेत्रांनीं भद्रच पहावें; स्थिर अंगांनीं व शरीरांनीं आम्ही तुमची स्तुति करणारे होत्साते देवानें दिलेल्या सर्व आयुष्यास प्राप्त होऊं. त्रिविध तापांची शांति होवो.

## संबन्धभाष्यम् ।

**ॐ ब्रह्मा देवानामित्याद्याथर्वणोपनिषत् ॥ अस्याश्च विद्यासंप्रदायकर्तृपारम्पर्यलक्षणसंबन्धमादावेवाऽऽह स्वयमेव स्तुत्यर्थम् । एवं हि महद्भिः परमपुरुषार्थसाधनत्वेन गुरुणाऽऽयासेन लब्धा विद्येति श्रोतृबुद्धिप्ररोचनाय विद्यां महीकरोति । स्तुत्या प्ररोचितायां हि विद्यायां सादराः प्रवर्तेरन्निति । प्रयोजनेन तु विद्यायाः साध्यसाधनलक्षणसंबन्धमुत्तरत्र वक्ष्यति "भिद्यते हृदयग्रन्थिः" इत्यादिना ॥**

**भाष्यार्थ**—ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः । ( अथर्वण वेदाचीं ब्रह्मोपनिषद्, गर्भोपनिषद् इत्यादि अनेक उपनिषदें आहेत. पण तीं शारीरक भाष्याच्या फारशीं उपयोगीं नाहींत. म्हणून श्रीशंकराचार्योनींहि त्यांचें व्याख्यान करण्याचें मनांत आणलें नाहीं. पण या मुंडकोपनिषदाचा 'अदृश्यत्वादिगुणको धर्मोक्तेः'—ब्र.भा अ.१ पा.२सूत्र २१ पृ.४२७—या अधिकरणांत उपयोग आहे. म्हणून भाष्यकार त्याच्या व्याख्यानास आरंभ करितात—) 'ॐ ब्रह्मा देवानां०' इत्यादि आथर्वणोपनिषदाचें व्याख्यान करण्याची आमची इच्छा आहे. [**मीमांसक**—अहोपण, हें उपनिषद् मंत्ररूप आहे आणि 'इषे त्वा०' इत्यादि मंत्र कर्मसंबंधानेंच प्रयोजनवान् होतात. म्हणजे कर्मोपयोगी असणें, हेंच त्यांचें प्रयोजन आहे. पण या मंत्रांचा कर्मांमध्यें विनियोग करणारें प्रमाण ह्मणजे कल्पसूत्र किंवा

ब्राह्मणवचन आढळत नाहीं. त्यामुळें यांचा संबंध कर्माशीं संभवत नाहीं. अर्थात् हे मंत्र निष्प्रयोजन आहेत. त्यामुळें त्यांचें व्याख्यान करण्याची इच्छा करणें व्यर्थ आहे. **सिद्धान्ती**--खरें आहे. पण हे मंत्र कर्मसंबद्ध जरी नसले तरी त्यांमध्यें ब्रह्मविद्याप्रकाशनसामर्थ्य असल्यामुळें विद्येशीं त्यांचा संबंध संभवतो. **मीमांसक**--' पण विद्येचा कर्ता पुरुष असतो; आणि असल्या पुरुषकर्तृक विद्येचें प्रकाशन जर हें उपनिषद् करूं लागलें तर तें पौरुषेय आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येईल आणि तें पौरुषेय म्हणजे पुरुषकृत आहे असें ठरलें कीं पुरुषाच्या ठिकाणच्या अज्ञान, विपरीत ज्ञान इत्यादि दोषांमुळें कदाचित् या उपनिषदांतहि दोष असतील, अशी शंका येणें साहजिक आहे. ती-शंका आली असतां उपनिषदांचें प्रामाण्य शिथिल होतें, आणि प्रामाण्यच नाहींसें झालें कीं, व्याख्यानाची इच्छाहि उत्पन्न होत नाहीं.'--**सिद्धान्ती**--या शंकेचा परिहार **'अस्याश्च०'**या भाष्यानें करितात-]=या उपनिषदाच्या स्तुतीकरितां तिच्या विद्येचा संप्रदाय चालविणाऱ्या पुरुषांचा परंपरारूप संबंध स्वतः श्रुतिच आरंभींच सांगत आहे.[पुरुष विद्येच्या संप्रदाय चालविणारे आहेत. स्वकल्पनेनें तिला निर्माण करणारे नाहींत. त्यांचें संप्रदायकर्तृत्वहि आजकालचें नाहीं, कीं ज्यामुळें तिच्याविषयीं अविश्वास वाटेल. तर तें अनादि परंपरागत आलेलें आहे. यास्तव अनादिसिद्ध ब्रह्मविद्येचें प्रकाशन करण्यास समर्थ असलेल्या उपनिषदांशीं पुरुषाचा संबंध संप्रदाय चालविणें, इतकाच येतो आणि तोच येथें आरंभी सांगितलेला आहे. पुरुष विद्येचे नुस्ते संप्रदायकर्ते आहेत. यास्तव विद्येचा जसा पुरुषांशीं संबंध असतो तसाच तिचें प्रतिपादन करणाऱ्या उपनिषदांशींहि असतो. **वादी**-- पण पौरुषेयत्वाचा परिहार करण्यासाठीं येथें पुरुषसंबंधच जर विवक्षित असेल तर तसा संबंध सांगणारा दुसरा कोणी असला पाहिजे. कारण स्वतः हें उपनिषद् अथवा वेदच जर आपला संबंध सांगूं लागला तर त्यावर स्ववृत्ति हा दोष येईल. स्ववृत्ति म्हणजे स्वतःच स्वतःची सिद्धि करणें. **सिद्धान्ती**--पण केवल स्तुतीकरितांच हें उपनिषद् स्वतःआपला संबंध सांगत असल्यामुळें त्याच्यावर स्ववृत्ति हा दोष येत नाहीं. त्या संबंधकथनाचें तात्पर्य विद्यास्तुतीमध्यें असल्यामुळें त्यावर स्ववृत्ति हा दोष येत नाहीं, असा याचा इत्यर्थ.]=**' एवं०'** -अशा रीतीनें मोठ्या लोकांनीं परम पुरुषार्थाचें साधन, या रूपानें मोठ्या प्रयासानें विद्या प्राप्त करून घेतली, असें सांगून श्रुति श्रोत्यांच्या बुद्धीमध्यें रुचि उत्पन्न करण्याकरितां विद्येला महत्त्ववती करीत आहे. तिला मोठी करीत आहे. स्तुतीच्या योगानें विद्येविषयीं लोकांच्या मनांत रुचि उत्पन्न झाली असतां लोक मोठ्या आदरानें तिच्या ठिकाणीं प्रवृत्त होतील, या अभिप्रायानें ही स्तुति केली आहे. [ विद्येचें जें प्रयोजन तेंच या उपनिषदाचेंहि प्रयोजन आहे, या अभिप्रायानें विद्येचा प्रयोजनाशीं संबंध सांगतात-]

**'प्रयोजनेन तु०'**—विद्येचा प्रयोजनाशीं असलेला साध्यसाधनलक्षणसंबंध पुढें हेंच उपनिषद् 'भिद्यते हृदयग्रन्थिः' इत्यादि वाक्यानें सांगणार आहे. [**मीमांसक**—"अहोपण संसाराच्या कारणाची निवृत्ति हेंच जर ब्रह्मविद्येचें फल असलें तर अपर विद्येनेंच संसाराची निवृत्ति होणें शक्य असल्यामुळें तिच्याकरितां ब्रह्मविद्याप्रकाशक उपनिषदाचें व्याख्यान करण्याचें कांहीं कारण नाहीं."या आक्षेपाचें **'अत्र च०'** या भाष्यानें समाधान—]

**भाष्यं—अत्र चापरशब्दवाच्यायामृग्वेदादिलक्षणायां विधिप्रतिषेधमात्रपरायां विद्यायां संसारकारणाविद्यादिदोषनिवर्तकत्वं नास्तीति स्वयमेवोक्त्वा परापरविद्याभेदकरणपूर्वकम्—'अविद्यायामन्तरे वर्तमानाः' इत्यादिना। तथा परप्राप्तिसाधनं सर्वसाधनसाध्यविषयवैराग्यपूर्वकं गुरुप्रसादलभ्यां ब्रह्मविद्यामाह—'परीक्ष्य लोकान्'इत्यादिना। प्रयोजनं चासकृद्ब्रवीति'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति'इति। 'परामृताः परिमुच्यन्ति सर्वे' इति च ॥**

**भाष्यार्थ**—या उपनिषदांत अपर या नांवानें सांगितली जाणारी, केवल विधि व प्रतिषेध सांगण्यांतच तत्पर असलेली व ऋग्वेदादिरूप अशा विद्येमध्यें संसाराचें कारण अविद्या व दुसरे दोष यांचें निवर्तन करण्याचें सामर्थ्य नाहीं, असें स्वतः श्रुतिच अगोदर पर विद्या व अपर विद्या असा विद्येचा विभाग करून 'अविद्यायामन्तरे वर्तमानाः' इत्यादि वचनांनीं सांगणार आहे. [अविद्या-काम-कर्म हे दोष हें संसाराचें कारण आहे. पण कर्मात्मक अपर विद्या त्याचें निवर्तन करूं शकत नाहीं. कारण ती कर्मरूप अपर विद्या व अविद्यादि दोष यांमध्यें विरोध नाहीं आणि विरोधावांचून एकाला दुसऱ्याची निवृत्ति करतां येत नाहीं. कारण समजा कीं, एखाद्याला पुढें पडलेल्या शिंपीकडे पाहून हें रूपें आहे असा भ्रम झाला व तो त्याच्या निवृत्तीकरितां प्राणायाम करूं लागला; तर तसल्या शतशः प्राणायामांनीं तरी तो भ्रम निवृत्त होईल का ? नाहीं. तो कां ? तर प्राणायाम व रुप्याचा भ्रम यांचा विरोध नाहीं, म्हणून. पण तेंच रुप्याच्या भ्रमाचें अधिष्ठान जी शिंप तिचें दर्शन होऊं दे, कीं तत्काल भ्रम निवृत्त होतो कीं नाहीं, तें समजेल. यास्तव स्वतः ही श्रुतिच अपर विद्येला संसारकारणनिवर्तकत्व नाहीं, असें सांगून पुढें ब्रह्मविद्या सांगत आहे. शिवाय 'परम पुरुषार्थाचें साधन,' या रूपानें ब्रह्मविद्येला परविद्यात्व व 'निकृष्ट संसाररूप फलाचें साधन,' या रूपानें कर्मविद्येला अपरविद्यात्व आहे. त्यामुळें अपरविद्या या नांवावरूनच ती मोक्षाचें साधन नाहीं असें कळतें. आतां कांहीं कर्मजड—"ब्रह्मविद्या कर्त्याला केवल संस्कार करणारी आहे. अर्थात् ती कर्माचें अंग असल्यामुळें स्वतंत्रपणें पुरुषार्थाचें साधन होऊं शकत नाहीं," असें म्हणत असतात, यास्तव भाष्यकार—या समजुतीचें निराकरण पुढच्या श्रुतिवचनानेंच

केलें आहे, असें '**तथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तसेंच सर्व साध्यसाधन-विषयक वैराग्यपूर्वक गुरुप्रसादानेंच प्राप्त होणारी ब्रह्मविद्या हें पर प्राप्तीचें साधन आहे, असें हीच श्रुति 'परीक्ष्य लोकान्०' इत्यादि वचनानें सांगणार आहे. [ब्रह्मविद्या जर कर्मांचें अंग असती तर कर्मांची येथें जी निंदा केलेली आहे ती उपपन्न झाली नसती. कारण अंगाचें विधान करावयाचें झाल्यास प्रधान अंगीची निंदा करीत नसतात. येथें तर सर्व साध्य व साधनें–म्हणजे स्वर्गादि व यज्ञादि यांची निंदा करून व त्यांविषयीं विरक्त होण्याचा उपदेश करून ब्रह्मविद्या हें परप्राप्तीचें साधन सांगितलेलें आहे. यास्तव ब्रह्मविद्या कर्मांचें किंवा उपासनेचें अंग नसून स्वत: प्रधानच आहे. त्यामुळें तिचें प्रकाशन करणारीं उपनिषदें मिमांसकांच्या म्हणण्याप्रमाणें कर्त्यांची स्तुति करणारीं नाहींत. "अहोपण, उपनिषदें जर स्वतंत्र ब्रह्मविद्येचीं प्रकाशक आहेत तर त्यांचें अध्ययन करणाऱ्या सर्वांनाच ती–ब्रह्मविद्या कां होत नाहीं, म्हणून कोणी उतावीळ स्वभावाचे मीमांसक म्हणतील, याकरितां भाष्यकारांनीं वर 'ती विद्या गुरुप्रसादानेंच प्राप्त होणारी आहे,' असें सुचविलें आहे. गुरूंचा अनुग्रह, स्वचित्तशुद्धि इत्यादि संस्कारांचा अभाव असल्यामुळें सर्वांनाच जरी ती न झाली तरी विशिष्ट अधिकाऱ्यांना ती अवश्य होते. **मीमांसक**–पण ब्रह्मविद्या कर्मांगभूत नसून स्वतंत्र आहे, असें जर म्हटलें तर तिच्या योगानें प्राप्त होणारें कांहीं प्रयोजनच नाहीं, असें होणार. कारण, सुखप्राप्ति व दुःख-परिहार हीं दोन्हीं प्रवृत्ति व निवृत्ति यांच्या योगानें साध्य होतात, असें आम्हांला शास्त्र व लोक यांवरून कळलें आहे. **सिद्धान्ती**–]='जो ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो,' मु. उ. १६४ असें व 'जिवंतपणींच ब्रह्मभूत झालेले ते सर्व सर्वप्रकारें मुक्त होतात.' मु.उ. १६२ असेंहि प्रयोजन श्रुति वारवार सांगत आहे.[ज्याचें विस्मरण झालें आहे अशा हातांत असलेल्या सुवर्णाचें नुस्तें स्मरण झाल्यानेंच, तें मिळालें आहेसें वाटतें व त्या प्राप्तीमुळें आनंद होतो, हें सर्वांना माहीतच आहे. त्याचप्रमाणें केवल ही दोरी आहे, एवढें कळल्यानेंच सर्पदर्शनामुळें झालेलें भय, कंप, इत्यादि दुःख कसें निवृत्त होतें, तेंहि प्रसिद्ध आहे. यास्तव प्रयोजन प्रवृत्ति-निवृत्तिसाध्यच असतें, असाच कांहीं अव्यभिचारी नियम नाहीं. एवढ्यासाठींच श्रुतिहि विद्येचा प्रयोजनाशीं संबंध वारंवार निःशंकपणें सांगते. यास्तव त्या सप्रयोजन विद्येचें प्रकाशन करणाऱ्या उपनिषदाचें व्याख्यान करणें उचित आहे. ]

**भाष्यं--ज्ञानमात्रे यद्यपि सर्वाश्रमिणामधिकारस्तथाऽपि संन्यासनिष्ठैव ब्रह्मविद्या मोक्षसाधनं न कर्मसहितेति 'भैक्ष्यचर्यां चरन्तः' 'संन्यासयोगात्' इति च ब्रुवन्दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—[ **समुच्चयवादी**–प्रत्येक ब्राह्मणानें स्वाध्याय करावा, म्हणजे आपापल्या वेदशाखेचें अध्ययन अवश्य करावें, असा विधि असून त्या अधीत वेदाचा अर्थ समजणें हें त्याचें फल आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांना वेदाध्ययनाचा अधिकार आहे. अर्थात् वेदाध्ययनसमयीं शिकलेल्या उपनिषदांपासून होणारें ब्रह्मज्ञान त्या सर्वांनाहि असणें अगदीं साहजिक आहे. त्यामुळें ब्रह्मज्ञानामध्यें त्या सर्वांचा अधिकार आहे, असें ठरतें. यास्तव सर्व आश्रमकर्मसमुचित ब्रह्मविद्याच मोक्षाचें साधन आहे, केवल ब्रह्मविद्या नव्हे. **सिद्धान्ती**–]=**'ज्ञानमात्रे॰'**–नुसत्या ज्ञानामध्यें सर्व आश्रमवानांचा जरी अधिकार असला तरी संन्यासनिष्ठा हीच ब्रह्मविद्या व तेंच मोक्षसाधन आहे. कर्मसहित विद्या मोक्षसाधन नव्हे,असें 'भैक्षचर्यां चरन्त:'–मु.उ.१४०–व'संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वा:'–मु.उ.१६२–इत्यादि म्हणणारी हीच श्रुति दाखवीत आहे. [सर्वस्वत्याग हाच संन्यास, त्यांत निष्ठा ठेवणें, निश्चित स्थिति करणें ही परब्रह्मविद्या होय. तीच मोक्षाचें साधन आहे, असें वेद दाखवीत आहे. तसल्या संन्याश्यापाशीं कर्मांचें साधन धन मुळींच नसतें. यास्तव त्यांच्या हातून कर्म होण्याचा संभव नाहीं. शम-दमादिकांनीं युक्त असलेल्या विद्याभ्यासामध्यें तत्पर होऊन राहणें, हाच त्यांचा आश्रमधर्महि आहे. म्हणजे त्यांना आश्रमधर्म म्हणून जो कांहीं आहे तो हा एवढाच. कारण शौच, आचमन इत्यादिकहि वस्तुतः त्यांचा आश्रमधर्म नव्हे. तर केवल लोकसंग्रहार्थ ते शौचादि करीत असतात. ज्ञानाभ्यासानेंच त्यांचें अपावनत्व निवृत्त होत असतें. या लोकीं 'ब्रह्मात्मैकत्वज्ञानासारखें दुसरें कांहीं पवित्र नाहीं,'–गी.४.३८–असें श्रीमद्भगवद्गीतेंत सांगितलें आहे.त्रिषवणस्नान, जप इत्यादिकांचे जे विधि आढळतात ते अज्ञसंन्याश्यासाठीं आहेत. यास्तव ज्ञानाशीं कर्मनिवृत्तीचाच सहभाव असतो. कर्मांचा सहभाव–सह असणें, एकत्र राहणें-संभवत नाहीं, असा याचा भावार्थ. ]

**भाष्यं**—**विद्याकर्मविरोधाच्च । न हि ब्रह्मात्मैकत्वदर्शनेन सह कर्म स्वप्नेऽपि संपादयितुं शक्यम् । विद्यायाः कालविशेषाभावादनियतनिमितत्वात्कालसंकोचानुपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—[कर्मसमुचित ब्रह्मविद्या मोक्षाचें साधन होऊं शकत नाहीं,याविषयीं आणखीं एक कारण सांगतात–] **'विद्याकर्म॰'**–शिवाय विद्या व कर्म यांचा विरोध आहे. कारण ब्रह्म व आत्मा यांच्या एकत्वज्ञानासह स्वप्नांतहि कर्म संपादन करितां येणें शक्य नाहीं. [ म्हणजे ज्यावेळीं ब्रह्मच आत्मा आहे, अशा प्रकारचें एकत्वज्ञान असतें त्याचवेळीं 'मी हें अमुक कर्म करितों,' असें म्हणून, त्याच ज्ञानी पुरुषाच्या हातून तें घडणें शक्य नाहीं. कारण 'मी अकर्तृ ब्रह्म आहें ' व ' मी करितों ' अशा दोन प्रकारच्या भावना

एकाच वेळीं होणें सर्वथा अयुक्त आहे. **समुच्चयवादी**—ब्रह्मात्मैकत्वज्ञानाचें जेव्हां विस्मरण होईल तेव्हां ज्याला आत्मज्ञान झालें आहे असाहि तो कर्म करूं शकेल, म्हणजे अशा रीतीनें समुच्चय संभवतो. **सिद्धान्ती**—]='**विद्यायाः०**'—कर्मांच्या अनुष्ठानाचा जसा—प्रातःकाल, मध्याह्नकाल, अपराह्णकाल इत्यादि—भिन्न भिन्न विशेष काल असतो तसा विद्येचा विशेषकाल नसतो. तिचें नियत निमित्तहि नसतें. त्यामुळें विद्येच्या कालाचा संकोच करणें युक्त नव्हे.

**भाष्यं**—**यत्तु गृहस्थेषु ब्रह्मविद्यासंप्रदायकर्तृत्वादि लिंगं न तात्स्थितन्यायं बाधितुमुत्सहते । न हि विधिशतेनापि तमःप्रकाशयोरेकत्रसद्भावः शक्यते कर्तुं किमुत लिंगैः केवलैरिति ॥ एवमुक्तसंबन्धप्रयोजनाया उपनिषदोऽल्पाक्षरं ग्रन्थविवरणमारभ्यते । य इमां ब्रह्मविद्यामुपयन्त्यात्मभावेन श्रद्धाभक्तिपुरःसराः सन्तस्तेषां गर्भजन्मजरारोगाद्यनर्थपूगं निशातयति परं वा ब्रह्म गमयत्यविद्यादिसंसारकारणं चात्यन्तमवसादयति विनाशयतीत्युपनिषत् । उपनिपूर्वस्य सदेरेवमर्थस्मरणात् ॥**

**भाष्यार्थ**—[ वादी—अहोपण, आंगिरःप्रभृति गृहस्थच विद्यासंप्रदायाचे प्रवर्तक आहेत, असें या उपनिषदावरूनहि ठरत आहे. यास्तव त्या लिंगावरूनच गृहस्थाश्रमाचीं कर्में व विद्या यांचा समुच्चय व्यक्त होत नाहीं का? **सिद्धान्ती**—]='**यत्तु०**'—आंगिरःप्रभृति गृहस्थांमध्यें विद्यासंप्रदायकर्तृत्वादि लिंग आढळतें, हें खरें; पण तें सिद्ध झालेल्या न्यायाचा बाध करूं शकत नाहीं. कारण शेंकडों विधींनींहि जर अंधकार व प्रकाश यांचा एकत्र सहवास संभवत नाहीं, तर नुसत्या लिंगांनीं त्यांचें एकत्र आस्तित्व कसें सिद्ध होणार! [न्याययुक्त लिंगच—वस्तूचें गमक—सूचक होत असतें, असा आमचा सिद्धान्त आहे. ज्ञान व कर्म यांच्या समुचयास अनुकूल असा न्याय तर नाहींच; पण उलट त्याचा असंभव दाखविणारा विरोध मात्र स्पष्ट आहे. यास्तव नुसत्या पूर्वोक्त लिंगावरून समुच्चयाची सिद्धि होत नाहीं. शिवाय अंगिरः-प्रभृति ब्रह्मविद्यासंप्रदायप्रवर्तकांचा गृहस्थाश्रम आभासमात्र होता. कारण तत्त्वानुसंधानानें त्याचा वारंवार बाध होणें अगदीं अपरिहार्य होतें. एवढ्यासाठींच जनकानें—'ज्या माझें स्वरूप सर्वत्र अनुविद्ध आहे किंवा ज्याचें वस्तुतः कांहींएक नाहीं त्या माझें सर्व मिथिला नगरी जरी पेटली तरी कांहीं जळत नाहीं' असे उद्गार काढलेले दिसतात. अहंभावावांचून यदृच्छेनें प्रारब्धवशात् होणाऱ्या कर्माभासाशीं ज्ञानाचा समुच्चय मानतां येत नाहीं. कारण त्या कर्माभासाविषयीं वेदांत कोठेंहि विधि आढळत नाहीं, असा याचा इत्यर्थ. असो; याप्रमाणें या उपनिषदाचें व्याख्यान करणें उचित आहे, असें सिद्ध करून आतां त्याचा उपसंहार

करितात–]='एवमुक्त०' याप्रमाणें पूर्वोक्त संबंध व प्रयोजन यांनीं युक्त असलेल्या उपनिषदाचें म्हणजे या ग्रंथरूप उपनिषदाचें संक्षिप्त विवरण आम्ही आरंभितों. [ उपनिषद् या शब्दानें जिचा उल्लेख केला जातो त्या विद्येकरितां हा ग्रंथ असल्यामुळें त्यालाहि तेंच लाक्षणिक नांव योजितात, हें सुचविण्यासाठीं 'उपनिषद्' या शब्दाचा 'विद्या' हा अर्थ कसा संभवतो तें सांगतात–]='ये इमां०'–जे श्रद्धा-भक्तिपुरःसर या ब्रह्मविद्येपाशीं आत्मभावानें (पर प्रेमास्पदत्वानें) जातात त्यांच्या–गर्भ, जन्म, जरा, रोग इत्यादि अनर्थसमूहास ही विद्या शिथिल करिते म्हणून या विद्येला 'उपनिषद्' म्हणतात अथवा ती परब्रह्मास पोंचविते, म्हणून तिला 'उपनिषद्' म्हणतात किंवा अविद्यादि-संसारकारणांचा अत्यंत 'अवसाद'–विनाश करिते म्हणून ती 'उपनिषद्' होय. कारण 'उप' व 'नि' या उपसर्गांसह असलेल्या 'सद्-'धातूचे शिथिल करणें, जवळ पोंचविणें व विनाश करणें, असे तीन अर्थ सांगितलेले आहेत.

**श्रुतिः**–– ॐ **ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता । स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह ॥ १ ॥**

**अर्थ**––ब्रह्मा इंद्रादि देवांमध्यें गुणांनीं श्रेष्ठ होऊन, किंवा सर्वांच्या पूर्वीं, अभिव्यक्त झाला. तो सर्व जगाचा कर्ता व उत्पन्न झालेल्या भुवनाचा गोप्ता आहे. तो सर्व विद्यांची आश्रयभूत ब्रह्मविद्या आपल्या अथर्वनांवाच्या ज्येष्ठ पुत्राला सांगता झाला. १.

**भाष्यं**––**ब्रह्मा परिवृढो महान्धर्मज्ञानवैराग्यैश्वर्यैः सर्वानन्यानतिशेत इति । देवानां द्योतनवतामिन्द्रादीनां प्रथमो गुणैः प्रधानः सन्प्रथमोऽग्रे वा संबभूवाभिव्यक्तः सम्यक्स्वातन्त्र्येणेत्यभिप्रायः । न तथा यथा धर्माधर्मवशात्संसारिणोऽन्ये जायन्ते । "योऽसावतीन्द्रियोऽग्राह्यः" इत्यादिस्मृतेः ॥**

**भाष्यार्थ**––[ असो; आतां 'ब्रह्मा देवानां०' इत्यादि मंत्राचें व्याख्यान आरंभितात–]='ब्रह्मा' म्हणजे परिवृढ, मोठा; धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य यांच्या योगानें इतर सर्वांहून अधिक होऊन राहतो, म्हणून तो परिवृढ–सर्व प्रकारें वाढलेला होय. [ 'ज्ञानमप्रतिघं यस्य वैराग्यं च जगत्पतेः । ऐश्वर्यं चैव धर्मश्च सह सिद्धं चतुष्टयम् ॥' म्हणजे ज्या जगत्पतीचें अप्रतिबद्ध ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य व धर्म हे चार गुण एकाच वेळीं किंवा एकत्र–एकामेकास न सोडतां–सिद्ध असतात, या स्मृतिवचनावरून तो इतर सर्वांचें ज्ञानादिकांच्या योगानें अतिक्रमण करून राहतो व त्यामुळेंच तो परिवृढ होय, असें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें 'योऽसावतीन्द्रियोऽग्राह्यः सूक्ष्मोऽव्यक्तः सनातनः । सर्वभूतमयोऽचिन्त्यः स एष स्वयमुद्बभौ ॥'–मनु.–म्हणजे जो हा अतींद्रिय, अग्राह्य, सूक्ष्म, अव्यक्त, सनातन, सर्वभूतमय, व अचिंत्य परमात्मा तो स्वयं उद्भूत झाला, या स्मृति-

वचनावरून त्याचें स्वातंत्र्य व्यक्त होत आहे. स्वयं उद्भूत झाला, याचा अर्थ—आम्हां मनुष्यादिकांप्रमाणें पितृवीर्य व मातृशोणित यांच्या संयोगानें तो झाला नाहीं तर त्या देहबीजांवांचूनच आविर्भूत झाला—असा आहे. ]=असा तो ब्रह्मा '**देवानां**'—प्रकाश-युक्त इंद्रादि देवांमध्यें '**प्रथम:**'—गुणांच्या योगानें मुख्य होऊन किंवा प्रथम म्हणजे देवांपूर्वी, चांगल्या प्रकारें—स्वातंत्र्यानें, असा याचा अभिप्राय; '**संबभूव**'—अभिव्यक्त झाला. बाकीचे संसारी जीव जसे धर्माधर्मवशात् उत्पन्न होतात तसा तो झाला नाहीं. कारण 'योऽसावतीन्द्रियोऽग्राह्य:०'—मनु. अ.१.—इत्यादि स्मृति याविषयीं प्रमाण आहे.

**भाष्यं:—विश्वस्य सर्वस्य जगत: कर्तोत्पादयिता । भुवनस्योत्पन्नस्य गोप्ता पालयितेति विशेषणं ब्रह्मणो विद्यास्तुतये । स एवं प्रख्यातमहत्त्वो ब्रह्मा ब्रह्मविद्यां ब्रह्मण: परमात्मनो विद्यां ब्रह्मविद्यां 'येनाक्षरं पुरुषं वेद सत्यम्' इति विशेषणात्परमात्मविषया हि सा । ब्रह्मणा वाऽग्रजेनोक्तेति ब्रह्मविद्या ॥**

**भाष्यार्थ**—तो ब्रह्मा '**विश्वस्य**'—सर्व जगाचा '**कर्ता**'—उत्पन्न करणारा व '**भुवनस्य गोप्ता**'—उत्पन्न झालेल्या जगाचें पालन करणारा आहे, विद्येच्या स्तुतीकरितां ब्रह्माला हें विशेषण दिलें आहे. याप्रमाणें '**स:**'—ज्याचें महत्त्व असें प्रख्यात आहे असा तो ब्रह्मा '**ब्रह्मविद्यां**'—ब्रह्माची—परमात्म्याची विद्या अथर्वनांवाच्या ज्येष्ठ पुत्राप्रत सांगता झाला, त्यानें ती विद्या आपल्या ज्येष्ठ पुत्राला दिली, असा पुढें संबंध. 'येनाक्षरं पुरुषं वेद सत्यम्'—मु.उ.१४१—म्हणजे ज्याच्या योगानें सत्य पुरुषाला जाणतो, या विशेषणामुळें ती परमात्मविषय आहे, असा निश्चय होतो. किंवा सर्वांच्या पूर्वी उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवानें सांगितलेली म्हणून ती ब्रह्मविद्या.

**भाष्यं—तां सर्वविद्याप्रतिष्ठां सर्वविद्याभिव्यक्तिहेतुत्वात्सर्वविद्याश्रयामित्यर्थ: । सर्वविद्यावेद्यं वा वस्त्वनयैव विज्ञायत इति । "येनाश्रुतं श्रुतं भवति अमतं मतमविज्ञातं विज्ञातम्" इति श्रुते: । सर्वविद्याप्रतिष्ठामिति च स्तौति । विद्यामथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह । ज्येष्ठश्चासौ पुत्रश्चानेकेषु ब्रह्मण: सृष्टिप्रकारेष्वन्यतमस्य सृष्टिप्रकारस्य प्रमुखे पूर्वमथर्वा सृष्ट इति ज्येष्ठस्तस्मै ज्येष्ठपुत्राय प्राहोक्तवान् ॥ १ ॥**

**भाष्यार्थ—'सर्वविद्याप्रतिष्ठां०'**—ती सर्व विद्यांच्या अभिव्यक्तीस कारण होणारी असल्यामुळें सर्व विद्यांची प्रतिष्ठा आहे. सर्व विद्यांचा आश्रय, असा याचा भावार्थ, ('अहं ब्रह्मास्मि०'—मी साक्षी चेतनात्मा ब्रह्म आहें, देहेंद्रियाशीं संबद्ध झालेला जीव नव्हे, अशा अर्थाच्या महावाक्यामुळें उत्पन्न झालेल्या बुद्धिवृत्तींत अभिव्यक्त झालेलें ब्रह्मच ब्रह्मविद्या आहे आणि तें ब्रह्म सर्वांना अभिव्यक्त कर-

णारें आहे, त्यामुळें सर्व विद्यांचें व्यंजक या रूपानें त्याचा आश्रय केला जातो म्हणून ब्रह्मविद्या सर्वविद्याश्रया होय. अथवा ती विद्या उत्पन्न झाली असतां आणखी कांहीं ज्ञातव्यच उरत नसल्यामुळें सर्व विद्यांची प्रतिष्ठा म्हणजे परिसमाप्ति होते, म्हणून ती सर्वविद्याप्रतिष्ठा होय, असें आतां सांगतात–)=**'सर्वविद्या०'**–अथवा सर्वविद्यांच्या योगानें जाणण्यास उचित असलेलें वस्तुजात या ब्रह्मविद्येच्या योगानेंच जाणलें जातें, म्हणून ही सर्वविद्याप्रतिष्ठा होय.कारण 'येनाश्रुतं श्रुतं भवति, अमतं मतमविज्ञातं विज्ञातम्'–छां.६.१. उ.पृ.४२१–म्हणजे "ज्याच्या योगानें, ज्याचें ज्ञान झालें असतां न ऐकलेलेंहि सर्व ऐकलें आहे, असें होतें," मनन न केलेल्याचेंहि मनन केलेलें आहे असें होतें व न जाणलेलेंहि जाणल्यासारखें होतें," अशा अर्थाची श्रुति याविषयीं प्रमाण आहे. 'सर्वविद्याप्रतिष्ठां' असें म्हणून श्रुति विद्येची स्तुति करीत आहे. असो; असा तो ब्रह्मा ती विद्या **'अथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह'**–अथर्व या ज्येष्ठ पुत्राला सांगता झाला. ज्येष्ठ असा पुत्र; ब्रह्मदेवाच्या अनेक सृष्टिप्रकारांतील एका सृष्टिप्रकाराच्या आरंभीं अगोदर त्यानें अथर्वाला निर्माण केलें म्हणून तो ज्येष्ठ. त्या ज्येष्ठ पुत्राला तो ती विद्या सांगता झाला. २

**श्रुतिः–अथर्वणे यां प्रवदेत ब्रह्माऽथर्वा तां पुरोवाचाङ्गिरे ब्रह्मविद्याम् ।**
**स भारद्वाजाय सत्यवहाय प्राह भारद्वाजोऽङ्गिरसे परावराम् ॥२॥**

**अथ**––ब्रह्मा अथर्वाला जी ब्रह्मविद्या सांगता झाला तीच ब्रह्मविद्या अथर्वा पूर्वी अङ्गीला सांगता झाला. तो अंगी सत्यवहनांवाच्या भारद्वाजाला सांगता झाला. याप्रमाणें श्रेष्ठापासून कनिष्ठाला प्राप्त झालेली ती विद्या भारद्वाज अङ्गिराला सांगता झाला.२

**भाष्यं––यामेतामथर्वणे प्रवदेतावदद्ब्रह्मविद्यां ब्रह्मा तामेव ब्रह्मणः प्राप्तामथर्वा पुरा पूर्वमुवाचोक्तवानङ्गिरेऽङ्गिर्नाम्ने ब्रह्मविद्याम् । स चाङ्गिर्भारद्वाजाय भरद्वाजगोत्राय सत्यवहाय सत्यवहनाम्ने प्राह प्रोक्तवान् । भारद्वाजोङ्गिरसे स्वशिष्याय पुत्राय वा परावरां परस्मात्परस्मादवरेण प्राप्तेति परावरा परापरसर्वविद्याविषयव्याप्तेर्वा तां परावरामङ्गिरसे प्राहेत्यनुषङ्गः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ––' ब्रह्मा यां अथर्वणे प्रवदेत '**–ब्रह्मानें जी ही ब्रह्मविद्या अथर्वणास सांगितलेली होती **' तां अथर्वा पुरा अंगिरे उवाच'**–तीच ब्रह्मदेवापासून प्राप्त झालेली ब्रह्मविद्या तो अथर्वा पूर्वी अंगीस देता झाला. पुढें **' सः भारद्वाजाय० '**–अंगीनें तीच भरद्वाज गोत्रांत उत्पन्न झालेल्या सत्यवहनांवाच्या मुनीस दिली. भारद्वाजानें अंगिरस नांवांच्या आपल्या पुत्राला किंवा शिष्याला ती परावरा विद्या दिली. **'परावरां'**–पर-पर पुरुषापासून अवर-अवर पुरुषास ती प्राप्त झाली म्हणून 'परावर' अथवा सर्व उच्च-नीच विद्यांच्या विषयांना व्यापल्यामुळें ती 'परवरा' होय. येथें पर म्हणजे श्रेष्ठ व अवर म्हणजे निकृष्ट. २.

**श्रुतिः—शौनको ह वै महाशालोऽङ्गिरसं विधिवदुपसन्नः पप्रच्छ ।**
**कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ॥ ३ ॥**

**अर्थ**—महा गृहस्थ शौनक अंगिरसापाशीं यथाशास्त्र ( हातांत समिधा घेऊन ) समीप प्राप्त होऊन म्हणाला. ' हे भगवन्, काय जाणलें असतां हें सर्व विशेषतः ज्ञात होतें. ' ३.

**भाष्यं-शौनकः शुनकस्यापत्यं महाशालो महागृहस्थोऽङ्गिरसं भारद्वाजशिष्यमाचार्यं विधिवद्यथाशास्त्रमित्येतत् । उपसन्न उपगतः सन्पप्रच्छ पृष्टवान् । शौनकाङ्गिरसोः संबन्धादर्वाग्विधिवद्विशेषणादुपसदनविधेः पूर्वेषामनियम इति गम्यते । मर्यादाकरणार्थं मध्यदीपिकान्यायार्थं वा विशेषणम् ॥**

**भाष्यार्थ**—' **महाशालः**'—महा गृहस्थ ' **शौनकः** '—शुनकाचा पुत्र वरील '**अंगिरसं**'—अंगिरसनांवाच्या भारद्वाजाच्या शिष्यापाशीं म्हणजे आपल्या आचार्यापाशीं '**विधिवत् उपसन्नः पप्रच्छ**'—यथाशास्त्र समीप गेला आणि असें विचारूं लागला. पण येथें शौनक व अंगिरस यांच्या संबंधापासून पुढें विधिवत्—यथाशास्त्र हें विशेषण योजलेलें असल्यामुळें त्या पूर्वीच्या लोकांना गुरूपसदनाविधीचा नियम नव्हता, असें सूचित होतें. यास्तव यापुढें गुरूपसदन अवश्य आहे, असा नियम करण्यासाठीं किंवा मध्यें—उंबऱ्यांत ठेवलेल्या दिव्याचा उजेड जसा दोन्ही खोल्यांत पडतो त्याप्रमाणें मध्यें असलेल्या या विधीचा मागच्या व पुढच्या विद्यार्थ्यांशीं संबंध व्हावा, म्हणून ' विधिवत् ' हें विशेषण येथें योजिलें आहे.

**भाष्यं—अस्मदादिष्वप्युपसदनविधेरिष्टत्वात् । किमित्याह । कस्मिन्नु भगवो विज्ञाते नु इति वितर्के भगवो हे भगवन्सर्वं यदिदं विज्ञेयं विज्ञातं विशेषेण ज्ञातमवगतं भवतीत्येकस्मिञ्ज्ञाते सर्वविद्भवतीति शिष्टप्रवादं श्रुतवाञ्शौनकस्तद्विशेषं विज्ञातुकामः सन्कस्मिन्न्विति वितर्कयन्पप्रच्छ ॥**

**भाष्यार्थ**—कारण आमच्यासारख्या अर्वाचीन विद्यार्थ्यांनाहि गुरूपसदनविधि इष्ट आहे. असो; शौनकानें काय विचारलें तें श्रुति सांगते—' **भगवः कस्मिन् नु विज्ञाते** ' —हे भगवन्, कोणाचें बरें ज्ञान झालें असतां—कोणाला साक्षात् जाणलें असतां ' **सर्वं इदं विज्ञातं भवति**'—बाकीचें 'हें सर्व विज्ञेय विज्ञात—विशेषप्रकारें ज्ञात—अवगत होतें? म्हणजे ' एकाला जाणलें असतां पुरुष सर्वज्ञ होतो, ' असा शिष्टांचा प्रवाद—संभाषण शौनकानें ऐकला होता. यास्तव त्या एकाचा विशेष जाणण्याची इच्छा करणारा असा होत्साता ' कोणाला बरें जाणलें असतां ' असा वितर्क करीत तो विचारता झाला.

**भाष्यं**--अथवा लोकसामान्यदृष्ट्या ज्ञात्वैव पप्रच्छ। सन्ति लोके सुवर्णादिशकलभेदाः सुवर्णत्वाद्येकत्वविज्ञानेन विज्ञायमाना लौकिकैः। तथा किं न्वस्ति सर्वस्य जगद्भेदस्यैकं कारणम्। यदेकस्मिन्विज्ञाते सर्वं विज्ञातं भवतीति ॥

**भाष्यार्थ**—[ किंवा माती, सूत इत्यादि उपादान कारणाहून मडकें, वस्त्र इत्यादि कार्यें पृथक् नसतात, त्यामुळें उपादानाचें ज्ञान झालें असतां त्याचें कार्यहि त्याबरोबर ज्ञात होतें, अशी सामान्य व्याप्ति दिसते. यास्तव तिच्या बलानें तो विचारता झाला, असें सांगतात—]=अथवा लोकांच्या सामान्य दृष्टीनेंच कार्य व कारण यांचें अपृथक्त्व ओळखून तो अंगिरसाला विचारूं लागला. कारण व्यवहारांतहि लोकांकडून सुवर्णादिकांचे अनेक तुकडे सुवर्णत्वादि-एकत्वविज्ञानानें ( म्हणजे हें सर्व सोनें आहे, अशा एकरूपानें ) जाणले जातात, हें प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणेंच या सर्व जगद्भेदाचें एक कारण काय बरें आहे? कीं जें एकच जाणलें असतां हें सर्व ज्ञात होईल ?

**भाष्यं**—नन्वविदिते हि कस्मिन्निति प्रश्नोऽनुपपन्नः। किमस्ति तदिति तदा प्रश्नो युक्तः। सिद्धे ह्यस्तित्वे कस्मिन्निति स्यात्, यथा कस्मिन्निधेयमिति ॥

**भाष्यार्थ**—( **शंका** )=अहोपण, अज्ञात असलेल्या वस्तूविषयीं 'कोणाला जाणलें असतां,' असा प्रश्न उपपन्न होत नाहीं. कारण अविदित वस्तूविषयीं 'ती अमुक एक वस्तु आहे का ?' असाच प्रश्न होणें युक्त होय. ज्याप्रमाणें 'कशामध्यें हें अमुक ठेवूं?' असें विद्यमान वस्तूविषयींच विचारलें जातें त्याप्रमाणें वस्तूचें अस्तित्व सिद्ध झाल्यावर 'कोणाला जाणलें असतां' असें विचारतां येणें शक्य आहे.

**भाष्यं**--नाक्षरबाहुल्यादायासभीरुत्वात्प्रश्नः संभवत्येव कस्मिन् न्वेकस्मिन्विज्ञाते सर्ववित्स्यादिति ॥ ३ ॥

**भाष्यार्थ**—( **समाधान** )=या शंकेंत कांहीं अर्थ नाहीं. कारण 'ती अमुक एक वस्तु आहे का?' असा प्रयोग केल्यास त्यांत अक्षरें अधिक असल्या कारणानें आयासहि अधिक होण्याचा संभव आहे. यास्तव त्या आयासाला भिऊन अविदित तत्त्वाविषयींहि 'कोणाला एकाला जाणलें असतां, पुरुष सर्वविद् होतो,' असा येथें केलेला प्रश्न संभवतो. ३.

**श्रुतिः**--तस्मै स होवाच। द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च ॥ ४ ॥

**मंत्रार्थ**—त्याला तो म्हणाला, 'दोन विद्या आहेत, असें जाणावें' असें वेदवेत्ते परमार्थदर्शी म्हणतात. एक पर विद्या व दुसरी अपर विद्या. ४.

**भाष्यं**—तस्मै शौनकायाङ्गिरा आह किलोवाच। किमित्युच्यते। द्वे विद्ये वेदितव्ये इति। एवं ह स्म किल यद्ब्रह्मविदो वेदार्थाभिज्ञाः परमार्थदर्शिनो

**वदान्ति । के ते इत्याह । परा च परमात्मविद्या । अपरा च धर्माधर्मसाधन-तत्फलविषया ॥**

**भाष्यार्थ**—'**तस्मै०**'—त्या शौनकाला अंगिरस म्हणतो; काय म्हणतो तें श्रुति सांगते—'**द्वे विद्ये वेदितव्ये**'—दोन विद्या आहेत, असें जाणावें, '**इति ह स्म०**' असें वेदार्थाचे अभिज्ञ परमार्थदर्शी म्हणतात. त्या कोणत्या? तेंहि श्रुति सांगते—एक '**परा**'—परमात्मविद्या व दुसरी '**अपरा**'—धर्म व अधर्म यांचीं साधनें व त्यांचें फल हा जिचा विषय आहे अशी—विद्या.

**भाष्यं—ननु कस्मिन्विदिते सर्वविद्भवतीति शौनकेन पृष्टं तस्मिन्वक्तव्येऽपृष्टमाहाङ्गिरा द्वे विद्ये इत्यादिना ॥**

**भाष्यार्थ**—(**शंका**)=अहोपण, शौनकानें 'कोणाला जाणलें असतां पुरुष सर्वविद् होतो,' असें विचारलें आहे. यास्तव तेंच सांगणें योग्य होय. पण तसें न करितां अंगिरस 'दोन विद्या जाणाव्या,' इत्यादि वचनानें न विचारलेलेंच कां सांगत आहे?

**भाष्यं—नैष दोषः । क्रमापेक्षत्वात्प्रतिवचनस्य । अपरा हि विद्याऽविद्या सा निराकर्तव्या । तद्विषये हि विदिते न किंचित्तत्त्वतो विदितं स्यादिति । निराकृत्य हि पूर्वपक्षं पश्चात्सिद्धान्तो वक्तव्यो भवतीति न्यायात् ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—(**समाधान**)=त्यांत कांहीं दोष नाहीं. कारण प्रतिवचनाला क्रमाची अपेक्षा असते. [ प्रतिवचन झालें म्हणून तें कांहीं एकदम देतां येत नाहीं. तर सांगोपांग द्यावयाचें झाल्यास तें क्रमानेंच द्यावें लागणार, हें उघड आहे. ]=अपरा विद्या ही अविद्या आहे. तिचें निराकरण करणेंच उचित आहे. कारण तिचा विषय जरी विदित झाला तरी तत्त्वत: कांहीं विदित होत नाहीं आणि पूर्वपक्षाचें निराकरण करून नंतर सिद्धान्त सांगावा, असा न्याय आहे. ४.

**श्रुतिः—तत्रापरा, ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति । अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ ५ ॥**

**अर्थ**—त्यांतील ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द व ज्योतिष ही अपरा विद्या आणि जिच्या योगानें तें अक्षर ब्रह्म अवगत होतें ती परा.

**भाष्यं—तत्र काऽपरेत्युच्यते । ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेद इत्येते चत्वारो वेदाः । शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमित्यङ्गानि षडेषाऽपरा विद्या । अथेदानीमियं परा विद्योच्यते यया तद्वक्ष्यमाणविशेषणमक्षरमधिगम्यते प्राप्यते । अधिपूर्वस्य गमेः प्रायशः प्राप्त्यर्थत्वात् । न च परप्राप्तेरवगमार्थस्य भेदोऽस्ति । अविद्याया अपाय एव हि परप्राप्तिर्नार्थान्तरम् ॥**

**भाष्यार्थ**—त्या दोन विद्यांतील 'अपरा' कोणती तें सांगतात—'ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, असे हे चार वेद; शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हीं सहा अंगें'—ही अपरा विद्या आहे. (कल्प म्ह० अनुष्ठेयाचा क्रम, तो ज्यांत सांगितलेला असतो त्या सूत्रग्रंथाला कल्प म्हणतात.) '**अथ परा**'—आतां ही परा विद्या सांगितली जात आहे. '**यया०**'—जिच्या योगानें पुढें सांगितलेल्या विशेषणांनीं युक्त असलेलें अक्षर अधिगत—प्राप्त केलें जातें ती परा. कारण 'अधि' या उपसर्गापुढें आलेल्या 'गम-'धातूचा प्रायः 'प्राप्ति' हा अर्थ होतो. अविद्येचा अपाय नाश हीच परप्राप्ति आहे. परप्राप्ति हा अविद्येच्या अपायाहून पृथक् पदार्थ नाहीं. यास्तव अवगम व परप्राप्ति या शब्दांच्या अर्थांत कांहीं फरक नाहीं.

**भाष्यं—ननु ऋग्वेदादिबाह्या तर्हि सा कथं परा विद्या स्यान्मोक्षसाधनं च 'या वेदबाह्याः स्मृतयः' इति हि स्मरन्ति । कुदृष्टित्वान्निष्फलत्वादनादेया स्यात् । उपनिषदां च ऋग्वेदादिबाह्यत्वं स्यात् । ऋग्वेदादित्वे तु पृथक्करणमनर्थकम् । अथ कथं परेति ॥**

**भाष्यार्थ**—(शंका–) तर मग ती ऋग्वेदादिकांहून बाह्य म्हणजे त्यांत अंतर्भूत न होणारी आहे; मग ती परा विद्या व मोक्षाचें साधन कसें होऊं शकेल? कारण 'या वेदबाह्या स्मृतयो०' इत्यादि स्मृतिवचन आहे. (मनु.१२.९५) त्यांत वेदबाह्य स्मृति व कुकल्पना यांना निष्फल म्हटलें आहे. यास्तव ही परा विद्याहि कुदृष्टि—कुकल्पना असल्यामुळें निष्फल व निष्फल असल्यामुळें अग्राह्य होईल. शिवाय विद्या वेदबाह्य झाल्यास तिचें प्रतिपादन करणारीं उपनिषदेंहि वेदबाह्य होतील. पण ऋग्वेदादिकांतच त्यांचा अंतर्भाव होतो म्हणून म्हटल्यास अपरविद्येहून परविद्येला पृथक् करणें व्यर्थ आहे. तेव्हां ब्रह्मविद्येला परा विद्या कसें म्हटलें आहे?

**भाष्यं—न । वेद्यविषयविज्ञानस्य विवक्षितत्वात् । उपनिषद्वेद्याक्षरविषयं हि विज्ञानमिह परा विद्येति प्राधान्येन विवक्षितं नोपनिषच्छब्दराशिः । वेदशब्देन तु सर्वत्र शब्दराशिर्विवक्षितः । शब्दराश्यधिगमेऽपि यत्नान्तरमन्तरेण गुर्वभिगमनादिलक्षणं वैराग्यं च नाक्षराधिगमः संभवतीति पृथक्करणं ब्रह्मविद्यायाः परा विद्येति कथनं चेति ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ—(समाधान)**—ही शंका बरोबर नाहीं. कारण 'परा-'शब्दानें येथें वेद्य वस्तु जें ब्रह्म त्याच्या विषयींचें विज्ञान विवक्षित आहे. उपनिषदांच्या योगानें जाणण्यास योग्य असलेलें जें अक्षर ब्रह्म, त्याविषयींचें विज्ञान येथें 'परा विद्या,' या शब्दानें मुख्यतः विवक्षित आहे. 'परा विद्या' या शब्दानें उपनिषद्रूप शब्दसमूह विवक्षित

नाहीं. पण 'वेद' या शब्दानें सर्वत्र शब्दराशि विवक्षित असतो व त्या शब्दराशीचा अधि-गम–प्राप्ति जरी झालेली असली तरी गुरूला शरण जाणें, इत्यादिरूप पृथक् यत्न केल्यावांचून व वैराग्यावांचून अक्षर ब्रह्माचा अधिगम संभवत नाहीं. यास्तव ब्रह्मविद्येला ऋग्वेदादिलक्षण अपरविद्येहून पृथक् केलें आहे व 'परा विद्या' असें नांव दिलें आहे.

**भाष्यं—यथा विधिविषये कर्त्राद्यनेककारकोपसंहारद्वारेण वाक्यार्थज्ञानकालादन्यत्रानुष्ठेयोऽर्थोऽस्त्यग्निहोत्रादिलक्षणो न तथेह परविद्याविषये वाक्यार्थज्ञानसमकाल एव तु पर्यवसितो भवति । केवलशब्दप्रकाशितार्थज्ञानमात्रनिष्ठाव्यतिरिक्ताभावात् । तस्मादिह परां विद्यां सविशेषणेनाक्षरेण विशिनष्टि— यत्तदद्रेश्यमित्यादिना । वक्ष्यमाणं बुद्धौ संहृत्य सिद्धवत्परामृश्यते— यत्तदिति ॥**

**भाष्यार्थ**—( कर्मज्ञानाहून अक्षरज्ञान अगदीं विलक्षण आहे, या अभिप्रायानेंहि पर विद्येला पृथक् केलें आहे, असें सांगतात–)=ज्याप्रमाणें विधिविषयामध्यें म्हणजे कर्मकांडांत कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान व अधिकरण या अनेक कारकांचा म्हणजेच क्रियेच्या उपयोगीं असलेल्या सामग्रीचा संग्रह करून–सामग्री जमवून–'ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्यानें यज्ञ करावा,' इत्यादि श्रुतिवाक्यांचा अर्थ कळल्यानंतर म्हणजे त्या वाक्यांचा अर्थ ज्यावेळीं कळतो त्याहून अन्यकालीं अग्निहोत्रादि अनुष्ठेय अर्थ असतो; ( अमुक कर्म करावें, असें वेदवाक्यानें सांगितलें आहे, हें त्या वाक्याचा अर्थ समजतांच, आपल्याला कळतें. पण तेवढ्या ज्ञानानेंच आमचें कांहीं एक हित होत नाहीं. कारण त्यानंतर वेदानें सांगितलेल्या कर्माचें अनुष्ठान करण्याची आवश्यकता असते. )='**न तथेह**॰'–पण या पर विद्याविषयांत तसा प्रकार नाहीं. तर ज्यावेळीं वाक्यार्थ ज्ञान होतें त्याच वेळीं वेदार्थ–अनुष्ठेयार्थ पर्यवसित–सर्वथा समाप्त होतो. कारण केवल शब्दांच्या योगानें प्रकाशित होणाऱ्या अर्थज्ञानांतच निष्ठा ठेवणें, त्यांतच निश्चयानें स्थित होणें, यावांचून दुसरें कांहीं कर्तव्य नसतें. ( उपनिषदातील महावाक्यांच्या योगानें प्रकाशित होणाऱ्या ब्रह्माच्या ज्ञानांतच निष्ठा ठेवणें यावांचून परा विद्येंत तिच्या अधिगमानंतर दुसरें कर्तव्य नसतें. )='**तस्मात्**॰'–तस्मात् आतां या पुढच्या 'यत्तदद्रेश्यं॰' इत्यादि सहाव्या मंत्रानें विशेषणयुक्त अक्षराच्या योगानें परा विद्येस अपर विद्येहून विशेष महत्त्वाची ठरविली आहे. पुढें जें सांगावयाचें आहे त्याचाच बुद्धीमध्यें उपसंहार करून सिद्ध वस्तूप्रमाणें 'यत्तद्॰' यानें त्याचा निर्देश केला जात आहे. [ म्ह॰ ब्रह्माचें वर्णन पुढें करावयाचें आहे. पण त्याचाच पूर्वीं मनांत संग्रह करून जणुं काय मागें वर्णन केल्याप्रमाणेंच, उल्लेख केला जात आहे. ]

श्रुतिः---यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादम् । नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः ॥ ६ ॥

अर्थ---अदृश्य, कर्मेंद्रियांचें अविषय, अन्वयरहित, द्रव्यधर्मरहित, चक्षुःश्रोत्ररहित, तसेंच तें कर्मेंद्रियरहित, नित्य, विविधरूपांनीं होणारें, सर्वगत, अतिसूक्ष्म व अव्यय असें जें भूतांचें कारण त्याला विवे ी लोक सर्वतः पाहतात. ६.

भाष्यं---अद्रेश्यमदृश्यं सर्वेषां बुद्धीन्द्रियाणामगम्यमित्येतत् । दृशेर्बहिष्प्रवृत्तस्य पञ्चेन्द्रियद्वारकत्वात् । अग्राह्यं कर्मेन्द्रियाविषयमित्येतत् । अगोत्रं गोत्रमन्वयो मूलमित्यनर्थान्तरम् । अगोत्रमनन्वयमित्यर्थः । न हि तस्य मूलमस्ति येनान्वितं स्यात् । वर्ण्यन्त इति वर्णा द्रव्यधर्माः स्थूलत्वादयः शुक्लत्वादयो वा । अविद्यमाना वर्णा यस्य तदवर्णमक्षरम् । अचक्षुःश्रोत्रं चक्षुश्च श्रोत्रं च नामरूपविषये करणे सर्वजन्तूनां ते अविद्यमाने यस्य तदचक्षुःश्रोत्रम् ॥

भाष्यार्थ---तें जें '**अद्रेश्यं**'--म्हणजे अदृश्य, सर्व ज्ञानेंद्रियांना अगम्य, असा याचा भावार्थ; कारण बाहेर प्रवृत्त झालेल्या दृक्शक्तीचीं श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें हीं द्वारें आहेत. '**अग्राह्यं**'--अग्राह्य--कर्मेंद्रियांचा विषय न होणारें; '**अगोत्रं**'--गोत्र म्हणजे अन्वय, मूळ. अर्थात् अगोत्र म्हणजे अनन्वय--असंबद्ध--अमूल; कारण तें ज्याच्याशीं संबद्ध होईल, असें त्याचें मूळ नाहीं. तें अक्षर ब्रह्म '**अवर्ण**' आहे. वर्ण म्हणजे स्थूलत्वादि अथवा शुक्लत्वादि द्रव्यधर्म. ज्यामध्यें असले द्रव्यधर्म नाहींत तें अवर्ण होय. तें '**अचक्षुःश्रोत्रं**' आहे. चक्षु म्हणजे नेत्रांत राहणारें व रूपाला पाहणारें इंद्रिय व श्रोत्र म्हणजे शब्दग्रहण करणारें कानांतील इंद्रिय. रूप व नाम हे ज्यांचे क्रमानें विषय आहेत अशीं दोन इंद्रियें आहेत. तीं सर्व प्राण्यांना असतात. परंतु तीं ज्याला नाहींत तें अक्षर ब्रह्म अचक्षुःश्रोत्र आहे. ( आतां हीं विशेषणें सांख्यांनीं मानलेल्या प्रधाननांवाच्या जगाच्या कारणालाहि लागू शकतात,--ब्र.भा.अ.१ पृ.४२७-- असें कोणी म्हणेल; पण अद्रेश्य, अग्राह्य व अवर्ण हीं वरील तीन विशेषणें जरी त्याला लावितां आलीं तरी 'अचक्षुःश्रोत्र' हें विशेषण त्याला लागत नाहीं. कारण प्रधान जड असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं प्राप्तच नसलेल्या चक्षुःश्रोत्रांचा येथें निषेध केला आहे. यास्तव वरील अद्रेश्य, अग्राह्य इत्यादि विशेषणेंहि प्रधानाचीं आहेत, असें समजणें अयोग्य आहे, असें आचार्य '**यः सर्वज्ञः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात--)

भाष्यं---यः सर्वज्ञः सर्वविदित्यादिचेतनावत्त्वविशेषणत्वात्प्राप्तं संसारिणामिव चक्षुःश्रोत्रादिभिः करणैरर्थसाधकत्वं तदिहाचक्षुःश्रोत्रमिति वार्यते "पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः" इत्यादिदर्शनात् ॥

**भाष्यार्थ**—'यः सर्वज्ञः सर्वविद्०'—म्हणजे जो सामान्यतः सर्व जाणणारा व विशेषतः सर्व जाणणारा आहे, असें म्हणून चेतनावान् पुरुषाला उचित असलेलीं विशेषणें या श्रुतींत दिलेलीं असल्यामुळें इतर संसारी जीवांप्रमाणें तें जगाचें कारण अक्षरहि चक्षुः-श्रोत्रादि इंद्रियांनीं विषयांचें ग्रहण करीत असेल, अशी शंका येते. यास्तव 'अचक्षुःश्रोत्र' असें म्हणून त्या शंकेचें येथें निवारण केलें जात आहे. 'पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः'—श्वे. ३. १९. सु. उ. पृ. ९३९—म्हणजे तो नेत्रांवांचून पाहतो व कर्णावांचून ऐकतो, असेंहि त्याचें वर्णन केलेलें आढळतें.

**भाष्यं—किं च तदपाणिपादं कर्मेन्द्रियरहितमित्येतत्। यत एवमग्राह्यमग्राहकं चातो नित्यमविनाशि। विभुं विविधं ब्रह्मादिस्थावरान्तप्राणिभेदैर्भवतीति विभुम्। सर्वगतं व्यापकमाकाशवत्सुसूक्ष्मं शब्दादिस्थूलत्वकारणरहितत्वात्। शब्दादयो ह्याकाशवाय्वादीनामुत्तरोत्तरं स्थूलत्वकारणानि तदभावात्सूक्ष्मम्॥**

**भाष्यार्थ**—तसेंच, तें '**अपाणिपादं**'—हस्त-पादरहित आहे. तें कर्मेंद्रियशून्य आहे, असा याचा भावार्थ. ज्याअर्थीं तें असें अग्राह्य व अग्राहक आहे त्याअर्थीं तें '**नित्यं**'—अविनाशी आहे. तें '**विभुं**'—विभु आहे. जें विविध होतें म्हणजे ब्रह्मादि-स्थावरान्त प्राणिभेदांनीं व्यक्त होतें तें विभु होय. तें तत्त्व '**सर्वगतं**'—आकाशाप्रमाणें व्यापक आहे. तें स्थूलत्वाच्या शब्दादि कारणांनीं रहित असल्यामुळें '**सुसूक्ष्मं**'—अतिशय सूक्ष्म आहे. कारण शब्दादि विषयच आकाश, वायु इत्यादि भूतांच्या उत्तरोत्तर स्थूलत्वाचीं कारणें आहेत. पण शब्दादिकांचा अभाव असल्यामुळें अक्षर सुसूक्ष्म आहे.

**भाष्यं—किं च तदव्ययमुक्तधर्मत्वादेव न व्येतीत्यव्ययम्। न ह्यनङ्गस्य स्वाङ्गापचयलक्षणो व्ययः संभवति शरीरस्येव। नापि कोशापचयलक्षणो व्ययः संभवति राज्ञ इव। नापि गुणद्वारको व्ययः संभवत्यगुणत्वात्सर्वात्मकत्वाच्च॥**

**भाष्यार्थ**—तसेंच '**तत् अव्ययं**'—तें अव्यय आहे. तें वर सांगितलेल्या प्रकारच्या धर्मांनीं युक्त असल्यामुळेंच व्यय पावत नाहीं. म्हणून तें अव्यय होय. कारण अंगरहित असलेल्या वस्तूचा—स्वांगाचा व्यय होणें—हा व्यय शरीराप्रमाणें संभवत नाहीं. [ अंगांचा क्षय होणें हाच व्यय आहे. शरीर अंगांनीं युक्त असल्यामुळें त्याचा क्षय होऊं शकतो. पण निरवयव ब्रह्माचा क्षय कसा होणार ? ]—राजाचा कोश—खजिना रिता झाला असतां क्षय संभवतो. पण संबद्ध वस्तूंचाच अभाव असल्यामुळें अक्षरब्रह्माचा तसा व्ययहि संभवत नाहीं. अक्षरब्रह्म गुणरहित व सर्वात्मक असल्याकारणानें त्याचा गुणांच्या द्वारा व्ययहि संभवत नाहीं. स्वरूपाहून पृथक् असलेली वस्तुच हेय—त्याग करण्यास योग्य—होते. पण अक्षर सर्वांचा आत्मा असल्याकारणानें त्याचा त्याग—व्यय संभवत नाहीं.

**भाष्यं—यदेवंलक्षणं भूतयोनिं भूतानां कारणं पृथिवीव स्थावरजङ्गमानां परिपश्यन्ति सर्वत आत्मभूतं सर्वस्याक्षरं पश्यन्ति धीरा धीमन्तो विवेकिनः। ईदृशमक्षरं यया विद्ययाऽधिगम्यते सा परा विद्येति समुदायार्थः॥ ६ ॥**

**भाष्यार्थ—'यद्भूतयोनिं'**—जी अशा लक्षणाची भूतयोनि, पृथिवी जसें स्थावर-जंगमांचें कारण तसें सर्व भूतांचें कारण आहे, **'धीराः'**—धीमान् विवेकी त्याच अक्षराला **'परिपश्यन्ति'**—सर्वतः पाहतात. ते सर्वांच्या आत्मरूप अक्षराला पाहतात. अशा प्रकारचें अक्षर ज्या विद्येच्या योगानें ज्ञात होतें ती परा विद्या होय, असा या सर्व मंत्राचा संक्षिप्त अर्थ आहे. ६

**श्रुतिः—यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामोषधयः संभवन्ति।**
**यथा सतः पुरुषात्केशलोमानि तथाऽक्षरात्संभवतीह विश्वम् ॥ ७ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणें कोळी तंतूंना उत्पन्न करतो व पुनः त्यांना आपल्या शरीरांत ओढून घेतो, किंवा ज्याप्रमाणें पृथ्वीमध्यें ओषधि—वनस्पति उत्पन्न होतात, अथवा ज्याप्रमाणें जिवंत पुरुषापासून केंस व लोम उत्पन्न होतात त्याप्रमाणें अक्षरापासून या सर्व संसारमंडलांत विश्व संभवतें. ७.

**भाष्यं—भूतयोन्यक्षरमित्युक्तं तत्कथं भूतयोनित्वमित्युच्यते प्रसिद्धदृष्टान्तैः। यथा लोके प्रसिद्धम्। ऊर्णनाभिर्लूताकीटः किंचित्कारणान्तरमनपेक्ष्य स्वयमेव सृजते स्वशरीराव्यतिरिक्तानेव तन्तून्बहिः प्रसारयति पुनस्तानेव गृह्णते च गृह्णाति स्वात्मभावमेवाऽऽपादयति। यथा च पृथिव्यामोषधयो व्रीह्यादिस्थावरान्ता इत्यर्थः। स्वात्माव्यतिरिक्ता एव प्रभवन्ति। यथा च सतो विद्यमानाज्जीवतः पुरुषात्केशलोमानि केशाश्च लोमानि च संभवन्ति विलक्षणानि। यथैते दृष्टान्तास्तथा विलक्षणं सलक्षणं च निमित्तान्तरानपेक्षाद्यथोक्तलक्षणादक्षरात्संभवति समुत्पद्यत इह संसारमण्डले विश्वं समस्तं जगत्। अनेकदृष्टान्तोपादानं तु सुखार्थप्रबोधनार्थम्॥ ७॥**

**भाष्यार्थ**—वर सांगितलेलें अक्षर भूतयोनि आहे, असें सांगितलें. पण त्याला भूतांचें योनित्व म्हणजे कारणत्व कसें? हें प्रसिद्ध दृष्टान्तांनीं सांगितलें जातें. **'यथा'**—जसें लोकांत प्रसिद्ध आहे **'ऊर्णनाभिः'**—कोळी कोणत्याहि दुसऱ्या कारणाची अपेक्षा न करितां स्वतःच आपल्या शरीराहून व्यतिरिक्त—भिन्न नसलेलेच तंतू **'सृजते'**—बाहेर पसरतो **'च गृह्णते'**—व पुनः त्यांनाच परत घेतो, आपल्या शरीरांत मिळवून टाकतो. **'यथा च०'**—आणि ज्याप्रमाणें पृथ्वीमध्यें व्रीहि, यव इत्यादिकांपासून वृक्षांपर्यंत सर्व ओषधि—वनस्पति, पृथ्वीच्या स्वरूपाहून अपृथक्च उत्पन्न होतात **'यथा सतः'**

–ज्याप्रमाणें विद्यमान–जिवंत पुरुषापासून त्याच्या स्वरूपाहून अगदीं विलक्षण, असे केंस व लोम संभवतात, ‘ **तथा०** ’–त्याप्रमाणेंच म्हणजे जसे हे दृष्टान्त आहेत त्याप्रमाणें या संसारमंडलांत सलक्षण व विलक्षण–चराचर समस्त जगत् दुसऱ्या निमित्ताची अपेक्षा न करणाऱ्या पूर्वोक्त लक्षणाच्या अक्षरापासून उत्पन्न होतें. अक्षराचा बोध अनायासानें व्हावा, म्हणून या मंत्रांत अनेक दृष्टान्तांचें ग्रहण केलें आहे. ( ‘ ब्रह्म जगाचें कारण होऊं शकत नाहीं. कारण तें सृष्टीच्या पूर्वी एकाकी–असहाय असतें. याला दृष्टान्त केवल एकट्या कुलालाचा. जसा–माती, चक्र इत्यादि सहकारी साधनांवाचून असलेला कुंभार मडकें हें कार्य करूं शकत नाहीं त्याप्रमाणें एकटें ब्रह्म जगत् करूं शकणार नाहीं,’ असा तर्क कोणीं केला असतां त्याचें व्यभिचारित्व दाखविण्यासाठीं कोळ्याचा दृष्टान्त दिला आहे. ‘ ब्रह्म जगाचें उपादान कारण नव्हे, कारण तें जगाहून भिन्न नाहीं. अभिन्न आहे. त्यामुळें तें स्वतःच्या रूपाचें जसें उपादान होऊं शकत नाहीं तसेंच स्वरूपाहून भिन्न नसलेल्या जगाचेंहि उपादान होत नाहीं.’ या अनुमानाचा व्यभिचार दाखविण्यासाठीं पृथ्वींतील ओषधि-वनस्पतींचा दृष्टान्त दिला आहे. ‘ जगाचें उपादान ब्रह्म नव्हे. कारण तें ब्रह्माहून अगदीं विलक्षण आहे. ब्रह्म चेतन व तें जड आहे. जें ज्याहून विलक्षण तें त्याचें उपादानकारण होत नाहीं. जसा मातीचा घट तंतूहून विलक्षण असल्यामुळें तंतू त्याचें उपादान होऊं शकत नाहीं त्याप्रमाणें.’ या अनुमानाचा व्यभिचार दाखविण्याकरितां जिवंत पुरुषापासून उद्भवणाऱ्या केंसांचा दृष्टान्त दिला आहे. तथापि यांतील कोणत्याहि एका दृष्टान्तानें वरील तिन्ही अनुमानांवर दोष देतां येणें शक्य असतांनाहि अक्षराचा बोध अनायासानें व्हावा, म्हणून येथें तीन दृष्टान्त दिले आहेत ) ७.

**श्रुतिः—तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते ।**
**अन्नात्प्राणो मनः सत्यं लोकाः कर्मसु चामृतम् ॥ ८ ॥**

**अर्थ**—ज्ञानलक्षण तपाच्या योगानें ब्रह्म किंचित् उपचय पावतें–वृद्धि पावतें. त्या उपचित ब्रह्मापासून अन्न–अव्याकृत उत्पन्न होतें. त्या अव्याकृतापासून प्राण, त्या हिरण्यगर्भाख्य प्राणापासून मन, त्या समष्टि मनापासून सत्यसंज्ञक भूतपंचक उद्भवतें. त्यापासून ब्रह्मांडाच्या द्वारा सप्त लोक, लोकांतील मनुष्यादिकांपासून कर्म व कर्मांच्या योगानें अमृतसंज्ञक कर्मफल उत्पन्न होतें. ८.

**भाष्यं—यद्ब्रह्मण उत्पद्यमानं विश्वं तदनेन क्रमेणोत्पद्यते न युगपद्बदरमुष्टिप्रक्षेपवदिति क्रमनियमविवक्षार्थोऽयं मन्त्र आरभ्यते । तपसा ज्ञानेनोत्पत्ति-**

विधिज्ञतया भूतयोन्यक्षरं ब्रह्म चीयत उपचीयत उत्पिपादयिषदिदं जगदङ्कुरमिव बीजमुच्छूनतां गच्छति पुत्रमिव पिता हर्षेण ॥

**भाष्यार्थ**—ब्रह्मापासून उत्पन्न होणारें जें विश्व तें या पुढील क्रमानें उत्पन्न होतें. बोरांची मूठ जशी एकाच क्षणीं फेंकतां येते त्याप्रमाणें तें एकाच वेळीं उत्पन्न होत नाहीं; असें व्यक्त करून क्रमाचा नियम सांगण्याच्या इच्छेनें हा मंत्र आरंभिला जातो. '**तपसा**'—ज्ञानानें—उत्पत्तिप्रकाराचें ज्ञान असणें या रूपानें (कारण त्याचें ज्ञानमयच तप आहे, असें श्रुतीनें पुढें वर्णन केलें आहे.) '**ब्रह्म**'—भूतांची योनि—अक्षर '**चीयते**'—उपचय पावतें. बीज जसें अंकुरभावास प्राप्त होतें त्याप्रमाणेंच उत्पन्न करण्याची इच्छा केलें गेलेलें हें जगत् किंचित् स्थूलतेस प्राप्त होतें. पुत्राला उत्पन्न करण्याची इच्छा करणारा पिता हर्षानें जसा उल्लसित होऊन किंचित् उपचय—वृद्धि पावतो त्याप्रमाणें ब्रह्म उत्पत्तिप्रकाराचें ज्ञान असल्यामुळें त्या ज्ञानानेंच उपचित होतें.

**भाष्यं**—एवं सर्वज्ञतया सृष्टिस्थितिसंहारशक्तिविज्ञानवत्तयोपचितात्ततो ब्रह्मणोऽन्नमद्यते भुज्यत इत्यन्नमव्याकृतं साधारणं संसारिणां व्याचिकीर्षितावस्थारूपेणाभिजायत उत्पद्यते । ततश्चाव्याकृताद्व्याचिकिर्षितावस्थातोऽन्नात्प्राणो हिरण्यगर्भो ब्रह्मणो ज्ञानक्रियाशक्त्यधिष्ठितजगत्साधारणोऽविद्याकामकर्मभूतसमुदायबीजाङ्कुरो जगदात्माऽभिजायत इत्यनुषङ्गः ॥

**भाष्यार्थ**—याप्रमाणें सर्वज्ञत्वामुळें—सृष्टि-स्थिति-संहारशक्ति व त्यांचें विज्ञान यांनीं युक्त असल्याकारणानें—उपचय पावलेल्या—'**ततः**'—त्या ब्रह्मापासून—'**अन्नं**'—अन्न—सर्व संसारी जीवांस साधारण असलेलें अव्याकृत—अव्यक्त—अन्न व्याचिकीर्षित अवस्थारूपानें '**अभिजायते**'—उत्पन्न होतें. जें खाल्लें जातें, ज्याचा उपभोग घेतला जातो तें अन्न. [ज्याला व्यक्त करण्याची इच्छा केली आहे, तें व्याचिकीर्षित.]='**अन्नात्**'—त्या अव्याकृत पण व्याचिकीर्षित अवस्थेस प्राप्त झालेल्या अन्नापासून '**प्राणः**'—म्हणजे हिरण्यगर्भ उत्पन्न होतो. ['मायातत्त्व हीच ईश्वरत्वाची उपाधि आहे. त्या उपाधीमुळेंच ब्रह्म ईश्वर होतें व ती उपाधि—मायातत्त्व महाभूतादिकांच्या रूपानें सर्व जीवांच्या अनुभवास येते. त्यामुळें तें मायातत्त्व सर्वसाधारण जरी असलें तरी उत्पन्न कसें होतें? कारण तें अनादिसिद्ध आहे,' या शंकेचें समाधान करण्यासाठीं भाष्यांत 'व्याचिकीर्षित अवस्थारूपानें उत्पन्न होतें' असें म्हटलें आहे. 'कर्मांच्या अनुष्ठानापासून उत्पन्न झालेल्या अपूर्वाशीं नित्यसंबद्ध असलेलें भूतें सूक्ष्म हेंच अव्याकृत आहे,' असें कित्येक म्हणतात. पण तें बरोबर नाहीं. कारण प्रत्येक जीवाचें तें—अपूर्वसमवायि सूक्ष्मभूत निरनिराळें असतें. त्यामुळें तें ईश्वरत्वाची उपाधि होऊं शकत नाहीं.

सामान्यरूपानें त्याचा जरी संभव आहेसें वाटलें तरी पृथिव्यादि सामान्येंहि अनेक आहेत व श्रुतीनें प्रकृतीला ‘ एक ’ असें म्हटलें आहे. आतां ती प्रकृतिहि जाड्यरूपी महामायाच आहे, असा जरी संभव असला तरी तिचा कर्मजन्य अपूर्वाशीं समवाय होणें शक्य नाहीं. कारण प्रकृति किंवा अपूर्व यांतील एकहि कारक नाहीं. कारक म्हणजे क्रियेच्या साक्षात् उपयोगी असलेले पदार्थ. बुद्धि, इंद्रियें इत्यादिकांनाच कारकत्व सांगितलेलें आहे आणि कारकांच्या अवयवांचे ठिकाणींच क्रियेचा समवाय–नित्यसंबंध मानलेला आहे. शिवाय कोणतेंहि कार्य आपल्या कारणाची प्रकृति–उपादान कारण झालें आहे, असें कोठेंहि आढळत नाहीं. यास्तव भूतसूक्ष्माला अपंचीकृत भूतांचें प्रकृतित्व संभवत नाहीं. यास्तव महाभूतांची उत्पत्ति, स्थिति इत्यादि संस्कारांचें स्थान व तीन गुणांची साम्यावस्था असें अव्याकृतादिनांवाचें मायातत्त्वच येथें समजावें. पूर्व कल्पामध्यें हिरण्यगर्भाची प्राप्ति व्हावी म्हणून सर्वोत्कृष्ट उपासना व कर्म यांचें ज्यानें अनुष्ठान केलें होतें त्याच्यावर अनुग्रह करण्यासाठीं मायोपाधिक ब्रह्म हिरण्यगर्भावस्था, या आकारानें विवर्त पावतें, व त्यामुळें तेंच जीवांशीं आपलें तादात्म्य समजणारा हिरण्यगर्भ होतें. ]=ब्रह्मापासून-ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति यांनीं युक्त असलेला व्यष्टि जीवांचा समष्टि –समूह-रूप सूत्रात्मा उत्पन्न होतो. तो अविद्या-काम-कर्मभूतसमुदायबीजाचा अंकुरच आहे.

**भाष्यं––तस्माच्च प्राणान्मनो मनआख्यं संकल्पविकल्पसंशयनिर्णयाद्यात्मकमभिजायते । ततोऽपि संकल्पाद्यात्मकान्मनसः सत्यं सत्याख्यमाकाशादिभूतपञ्चकमभिजायते । तस्मात्सत्याख्याद्भूतपञ्चकादण्डक्रमेण सप्तलोका भूरादयः । तेषु मनुष्यादिप्राणिवर्णाश्रमक्रमेण कर्माणि । कर्मसु च निमित्तभूतेष्वमृतं कर्मजं फलम् । यावत्कर्माणि कल्पकोटिशतैरपि न विनश्यन्ति तावत्फलं न विनश्यतीत्यमृतम् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**––‘ **तस्माच्च०** ’–आणि त्या हिरण्यगर्भाख्य प्राणापासून ‘**मनः**’–संकल्पविकल्प-संशय-निर्णयात्मक समष्टि मन उत्पन्न होतें. त्या संकल्पादिरूप मनापासूनहि ‘**सत्यं**’ –सत्यसंज्ञक आकाशादि भूतपंचक उत्पन्न होतें. ‘ **लोकाः** ’–त्या सत्यसंज्ञक भूतपंचकापासून ब्रह्मांडक्रमानें भूः, भुवर् इत्यादि सात लोक होतात. त्या लोकांत मनुष्यादि प्राणी, वर्ण व आश्रम, या क्रमानें कर्में होतात. ‘ **कर्मसु च अमृतं** ’–कर्मांमध्यें म्हणजे फलांचें निमित्त, अशा कर्मांमध्यें अमृत म्हणजे कर्मजन्य फल होतें. कोट्यवधि कल्प लोटले तरी जोंवर कर्में क्षीण होत नाहींत तोंवर फलाचा विनाश होत नाहीं, म्हणून तें अमृत होय. ८

श्रुतिः—यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः ।
तस्मादेतद्ब्रह्म नाम रूपमन्नं च जायते ॥ ९ ॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि प्रथममुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**अर्थ**—जो अक्षरसंज्ञक सर्व सामान्यज्ञ व सर्व विशेषज्ञ, ज्याचें ज्ञानमयच तप आहे त्याच्यापासून हें हिरण्यगर्भाख्य ब्रह्म, नाम, रूप व व्रीहि-यवादिरूप अन्न उत्पन्न होतें. ९

**भाष्यं**—उक्तमेवार्थमुपसंजिहीर्षुर्मन्त्रो वक्ष्यमाणार्थमाह—य उक्तलक्षणोऽक्षराख्यः सर्वज्ञः सामान्येन सर्वं जानातीति सर्वज्ञः । विशेषेण सर्वं वेत्तीति सर्ववित् । यस्य ज्ञानमयं ज्ञानविकारमेव सार्वज्ञ्यलक्षणं तपो नाऽऽयासलक्षणं तस्माद्यथोक्तात्सर्वज्ञादेतदुक्तं कार्यलक्षणं ब्रह्म हिरण्यगर्भाख्यं जायते । किं च नामासौ देवदत्तो यज्ञदत्त इत्यादिलक्षणम् । रूपमिदं शुक्लं नीलमित्यादि । अन्नं च व्रीहियवादिलक्षणं जायते । पूर्वमन्त्रोक्तक्रमेणेत्यविरोधो द्रष्टव्यः ॥ ९ ॥

**भाष्यार्थ**—'**उक्तमेव०**'-आतां या पुढें अविद्याविवरणप्रकरण आरंभावयाचें असल्यामुळें त्याकरितां मागें सांगितलेल्या अर्थाचा उपसंहार करण्याची इच्छा करणारा हा मंत्र म्हणतो—' यः '—जो वर सांगितलेल्या लक्षणाचा अक्षरसंज्ञक '**सर्वज्ञः**'—सामान्यतः—समष्टिरूपानें मायोपाधीच्या द्वारा सर्व जाणतो म्हणून सर्वज्ञ '**सर्वविद्**'—विशेषतः व्यष्टिरूपानें—अविद्यासंज्ञक उपाधीनें अनन्त जीवभावास प्राप्त झालेला तोच सर्व--आपली उपाधि व तिच्याशीं संबद्ध झालेलें दुसरें सर्व जाणतो म्हणून सर्वविद् आहे. '**यस्य ज्ञानमयं तपः**' ज्याचें ज्ञानमय—ज्ञानविकाररूपच सर्वज्ञलक्षण तप आहे, आयासरूप तप नाहीं. [ इतर प्रजापती शरीरक्लेशरूप तप करूनच जगाचे स्रष्टे झाले, असें पुराणांत वर्णन केलें आहे. त्याप्रमाणें ब्रह्मालाहि क्लेशरूप तपानेंच स्रष्टृत्व प्राप्त होतें असें जर म्हटलें तर त्याच्याकडे संसारित्वहि येणार, अशी शंका कोणी घेऊं नये, म्हणून 'ज्याचें ज्ञानमय तप आहे,' असें म्हटलें आहे. सत्त्वप्रधान मायेचा ज्ञान हा विकार आहे. उत्पन्न करावयाच्या सर्व पदार्थांविषयीं चांगलें ज्ञान असणें, हाच तो ज्ञानविकार व तप होय.]='**तस्मात्**'—अशा त्या पूर्वोक्त सर्वज्ञापासून '**एतत् ब्रह्म**'—वर सांगितलेलें कार्यलक्षण हिरण्यगर्भसंज्ञक ब्रह्म उत्पन्न होतें. तसेंच त्यापासून '**नाम रूपं अन्नं च जायते**'—हा देवदत्त हा यज्ञदत्त इत्यादि नांव, हें शुभ्र, हें काळें इत्यादि रूप, व्रीहि-यव इत्यादि अन्न उत्पन्न होतें. पूर्वीच्या मंत्रांत सांगितलेल्या क्रमानें सर्व होत असल्यामुळें त्या व या मंत्रार्थांत विरोध येत नाहीं, असें जाणावें. ९ ( इति प्रथम मुंडकाचा प्रथम खंड समाप्त )

**भाष्यं**—साङ्गा वेदा अपरा विद्योक्ता— ऋग्वेदो यजुर्वेद इत्यादिना । यत्तदद्रेश्यमित्यादिना नामरूपमन्नं च जायत इत्यन्तेन ग्रन्थेनोक्तलक्षणमक्षरं यया

**विद्ययाऽधिगम्यत इति परा विद्या सविशेषणोक्ता । अतः परमनयोर्विद्ययोर्विषयौ विवेक्तव्यौ संसारमोक्षावित्युत्तरो ग्रन्थ आरभ्यते ॥**

**भाष्यार्थ**––अंगांसह चार वेद ही अपरा विद्या असें 'ऋग्वेदो यजुर्वेद०'–इत्यादि पहिल्या मुंडकांत पांचव्या मंत्रानें सांगितलें. नंतर 'यत्तदद्रेश्यं०' इत्यादि सहाव्या मंत्रापासून वरील 'नाम रूपं अन्नं च जायते' या नवव्या मंत्राच्या अंतापर्यंत असलेल्या ग्रंथानें ज्याचें लक्षण सांगितलें आहे 'तें अक्षर ब्रह्म ज्या विद्येच्या योगानें साक्षात् ज्ञात होतें ती परा विद्या,' असें म्हणून परा विद्या विशेषणांसह सांगितली. आतां यापुढें या दोन विद्यांचे संसार व मोक्ष हे दोन विषय अगदीं पृथक् करून दाखविणें उचित असल्यामुळें त्यासाठीं पुढील ग्रंथ आरंभिला जातो.

**भाष्यं—तत्रापरविद्याविषयः कर्त्रादिसाधनक्रियाफलभेदरूपः संसारोऽनादिरनन्तो दुःखस्वरूपत्वाद्धातव्यः प्रत्येकं शरीरिभिः सामस्त्येन नदीस्रोतोवदव्यवच्छेदरूपसंबन्धः । तदुपशमलक्षणो मोक्षः परविद्याविषयोऽनाद्यनन्तोऽजरोऽमरोऽमृतोऽभयः शुद्धः प्रसन्नः स्वात्मप्रतिष्ठालक्षणः परमानन्दोऽद्वय इति॥**

**भाष्यार्थ**––'**तत्रापर०**'–त्यांतील अपरविद्येचा विषय असा हा संसार कर्ता, करण इत्यादि साधनांनीं होणाऱ्या क्रिया, त्यांचें फल इत्यादि भेदरूप, उपादानरूपानें अनादि व ब्रह्मज्ञान होण्यापूर्वी नाश पावत नसल्यामुळें अनन्त आहे. तो दुःखरूप असल्यामुळें शरीर धारण करणाऱ्या जीवांतील प्रत्येकानें त्याचें पूर्णपणें हान–त्याग करावा. (भाष्यकारांच्या या वचनानें एकजीववाद्याचें निरसन होतें. ते म्हणतात कीं, एकच चैतन्य एकाच अविद्येमुळें बद्ध होत्सातें संसार करतें व तेंच कदाचित्–यदृच्छेनें मुक्त होतें. आह्मांला बंध व मोक्ष यांतील कांहीं नाहीं. हें मत श्रुतिसंमत तर नाहींच. पण युक्तीनेंहि सिद्ध होत नाहीं. कारण चैतन्यच जर बद्ध व मुक्त होतें, म्हणून समजलें तर ज्यांना बंध व मोक्ष नाहीं ते आम्हीं कोण ? याचा उलगडा होत नाहीं. असो; क्रिया-कारक-फल इत्यादि भेदरूप संसाराचें प्रहाण सुषुप्तावस्थेंतहि होतें. आणि तें जरी सर्वथा त्याज्यच असलें तरी स्वाभाविक आहे. स्वभावसिद्ध धर्माला अथवा अवस्थेला पुरुषार्थ म्हणतां येत नाहीं. यास्तव संसाराचें बुद्धिपूर्वक प्रहाण करणें यांत विशेष आहे, अशा अभिप्रायानें आचार्य म्हणतात-]='**सामस्त्येन हातव्यः**'–त्या संसाराचें पूर्णपणें म्हणजे सकारण प्रहाण केलें पाहिजे [ अविद्या हें संसाराचें कारण आहे. यास्तव आत्मज्ञानानें तिचा नाश केल्यामुळें तिच्या कार्याचें आत्यंतिक प्रहाण होणें हें विद्येचें फल आहे–]='**नदीस्रोतोवत्०**'–तो संसार नदीच्या प्रवाहाप्रमाणें सतत अविच्छिन्न संबंधानें असतो. [ नदीच्या प्रवाहाप्रमाणें क्रिया, कारक व फल यांचा अव्यवच्छेदरूप

–संतत संबंध हाच संसार होय–]=‘ **तदुपशमलक्षणः०**’–त्या संसाराचा उपशम हेंच ज्याचें लक्षण–स्वरूप आहे असा मोक्ष परविद्येचा विषय आहे. तो मोक्ष अनादि, अनन्त, अजर, अमर–अपक्षयरहित अमृत–नाशरहित, अभय, शुद्ध, प्रसन्न, स्वस्वरूपांत प्रतिष्ठित होणें ह्या रूपाचा, परमानन्द व अद्वय आहे.

**श्रुतिः—तदेतत्सत्यं मन्त्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि। तान्याचरथ नियतं सत्यकामा एष वः पन्थाः सुकृतस्य लोके॥ १**

**अर्थ**—तें हें सत्य आहे. म्हणजे बुद्धिमान् ऋषींनीं मंत्रांमध्यें जीं कर्में पाहिलीं तेंच हें सत्य आहे. तीं कर्में त्रेतायुगांत बहुत प्रकारें प्रवृत्त झालीं आहेत. यास्तव तुम्ही कर्मफलाची इच्छा करणारे होत्साते तीं कर्में नित्य करा. स्वतः केलेल्या कर्मांच्या फलाची प्राप्ति होण्यास हाच तुम्हांला मार्ग आहे. १.

**भाष्यं—पूर्वं तावदपरविद्याया विषयप्रदर्शनार्थमारम्भः। तद्दर्शने हि तन्निर्वेदोपपत्तेः। तथा च वक्ष्यति—“ परीक्ष्य लोकान्कर्मचितान् ” इत्यादिना। न ह्यप्रदर्शिते परीक्षोपपद्यत इति तत्प्रदर्शयन्नाह–तदेतत्सत्यमवितथम्। किं तन्मन्त्रेष्वृग्वेदाद्याख्येषु कर्माण्यग्निहोत्रादीनि मन्त्रैरेव प्रकाशितानि कवयो मेधाविनो वसिष्ठादयो यान्यपश्यन्दृष्टवन्तः। यत्तदेतत्सत्यमेकान्तपुरुषार्थसाधनत्वात्॥**

**भाष्यार्थ**—[ याप्रमाणें अपर विद्या व पर विद्या यांचे विषय दाखवून आतां प्रथम अपर विद्येचाच विषय दाखविण्यामध्यें श्रुतीचा कोणता अभिप्राय आहे तें सांगतात–]=‘ **पूर्वं तावत्०** ’–आतां अगोदर अपर विद्येचा अर्थ स्पष्टपणें दाखविण्याकरितां श्रुति आरंभ करीत आहे. कारण अपरविद्येचें फल काय आहे तें समजलें असतां त्याविषयीं निर्वेद–वैराग्य उत्पन्न होणें शक्य आहे. कारण पुढें याच खंडाच्या बाराव्या मंत्रांत ‘ परीक्ष्य लोकान् कर्मचितान्० ’ म्हणजे कर्मांच्या योगानें प्राप्त होणाऱ्या फलांचें परीक्षण करून, इत्यादि म्हटलें आहे. पण तें फल काय आहे, तें स्पष्टपणें दाखविल्यावांचून परीक्षा करितां येणें शक्य नाहीं. यास्तव तें–अपरविद्येचें फल–दाखविणारा हा मंत्र म्हणतो–‘ **तत् एतत् सत्यं०** ’–तें हें सत्य–अमिथ्या आहे. पण तें म्हणजे काय? तर ‘**मन्त्रेषु०**’–ऋग्वेदादिसंज्ञक मंत्रांमध्यें मंत्रांनींच प्रकाशित केलेलीं ‘**यानि कर्माणि**’–जीं अग्निहोत्रादि कर्में–‘**कवयः**’–वसिष्ठादि महाबुद्धिमानांनीं पाहिलीं, तें हें सत्य आहे. कारण तीं कर्में अव्यभिचारी–नित्य पुरुषार्थाचीं साधनें आहेत.

**भाष्यं—तानि च वेदविहितान्यृषिदृष्टानि कर्माणि त्रेतायां त्रयीसंयोगलक्षणायां हौत्राध्वर्यवौद्गात्रप्रकारायामधिकरणभूतायां बहुधा बहुप्रकारं संततानि प्रवृत्तानि कर्मिभिः क्रियमाणानि त्रेतायां वा युगे प्रायशः प्रवृत्तान्यतो यूयं**

**तान्याचरथ निर्वर्तयथ नियतं नित्यं सत्यकामा यथाभूतकर्मफलकामाः सन्तः। एष वो युष्माकं पन्था मार्गः सुकृतस्य स्वयं निर्वर्तितस्य कर्मणो लोके फलनिमित्तं लोक्यते दृश्यते भुज्यत इति कर्मफलं लोक उच्यते। तदर्थं तत्प्राप्तय एष मार्ग इत्यर्थः। यान्येतान्यग्निहोत्रादीनि त्रय्यां विहितानि कर्माणि तान्येष पन्था अवश्यफलप्राप्तिसाधनमित्यर्थः॥ १॥**

**भाष्यार्थ**—'**तानि०**'–आणि तीं वेदविहित व ऋषिदृष्ट कर्में '**त्रेतायां**'–त्रयीसंयोगलक्षण ऋग्वेदविहित हौत्र, यजुर्वेदविहित आध्वर्यव, सामवेदविहित औद्गात्र, एतद्रूप अधिकरणभूत त्रेतेमध्यें कर्मठांकडून '**बहुधा**'–बहु प्रकारें '**संततानि**'–प्रवृत्त केलीं जातात. अथवा 'त्रेतायां' म्हणजे त्रेतायुगांत तीं प्रायशः प्रवृत्त झालीं आहेत. [म्ह० त्रेतायुगांत तीं अधिक प्रमाणानें प्रवृत्त झालीं] यास्तव '**सत्यकामाः तानि नियतं आचरथ**'–वेदांत वर्णन केलेल्या प्रकारचें फल मिळविण्याची इच्छा करणारे असे होत्साते तुम्हीहि तीं कर्में नित्य करा.'**सुकृतस्य लोके वः एषः पन्थाः**'–स्वतः केलेल्या कर्मांच्या फलाची प्राप्ति होण्यास्तव तुम्हांला हाच मार्ग आहे. कर्मांचें फल भोगलें जात असल्यामुळें, त्याचा अनुभव घेतला जात असल्यामुळें त्याला 'लोक' असें येथें म्हटलें आहे. अर्थात् 'सुकृतस्य लोके' म्हणजे सुकृताच्या लोकांकरितां–स्वतः केलेल्या कर्मांच्या फलप्राप्तीकरितां–हा मार्ग आहे, असा त्याचा इत्यर्थ. हीं जीं अग्निहोत्रादि वेदविहित कर्में तोच हा मार्ग–अवश्य फलप्राप्तीचें साधन–आहे असा इत्यर्थ. १.

**श्रुतिः—यदा लेलायते ह्यर्चिः समिद्धे हव्यवाहने**
**तदाऽऽज्यभागावन्तरेणाऽऽहुतीः प्रतिपादयेत्॥ २॥**

**अर्थ**—अग्नि चांगला प्रदीप्त झाला असतां जेव्हां त्याची ज्वाला वर चालू–हालूं लागते तेव्हां तिच्यामध्यें आज्यभागांच्या मध्यभागीं आहुत्या द्याव्यात. २.

**भाष्यं—तत्राग्निहोत्रमेव तावत्प्रथमं प्रदर्शनार्थमुच्यते सर्वकर्मणां प्राथम्यात्। तत्कथम्। यदैवेन्धनैरभ्याहितैः सम्यगिद्धे समिद्धे हव्यवाहने लेलायते चलत्यर्चिस्तदा तस्मिन्काले लेलायमाने चलत्यर्चिष्याज्यभागावाज्यभागयोरन्तरेणमध्य आवापस्थान आहुतीः प्रतिपादयेत्प्रक्षिपेद्देवतामुद्दिश्य। अनेकाहप्रयोगापेक्षयाऽऽहुतीरिति बहुवचनम्॥**

**भाष्यार्थ**—श्रुति प्रथम त्यांतील अग्निहोत्राचाच, प्रदर्शनार्थ, उल्लेख करिते. कारण अग्निहोत्र हें इतर सर्व अग्निसाध्य कर्मांतील पहिलें कर्म आहे. अग्निहोत्रच कसें सांगितलें जात आहे तें पहा–'**यदा समिद्धे हव्यवाहने**–जेव्हां चांगलीं काष्ठें घालून त्यांच्यायोगानें अग्नि चांगला पेटला असतां '**अर्चिः लेलायते**'–त्याची ज्वाला (ध्वजावरील

वस्त्राप्रमाणें ) हालूं लागते ' **तदा आज्यभागौ अन्तरेण** '—तेव्हां ती ज्वाला वेगानें चंचल होत असतांना आज्यभागांच्या मध्यें आवापस्थानीं देवतांस उद्देशून ' **आहुती: प्रतिपादयेत्** '—आहुती द्याव्या. [ दर्श-पूर्णमासांत आहवनीय अग्नीच्या दक्षिण व उत्तर बाजूस ' अग्नये स्वाहा ' व ' सोमाय स्वाहा ' या मंत्रांनीं क्रमानें घृताच्या दोन आहुती देतात. त्यांना आज्यभाग म्हणतात. त्या दोन आहुतींच्या मध्यें बाकीचे याग केले जातात. त्या मध्यस्थानाला आवापस्थान म्हणतात. दोन सकाळीं व दोन संध्याकाळीं अशा अग्निहोत्राच्या दोन-दोन आहुतिच असतांना]='आहुती:' असें या मंत्रांत बहुवचन जें योजिलें आहे तें अनेक दिवसांनीं साध्य होणाऱ्या प्रयोगाच्या अनुष्ठानास उद्देशून आहे. २

**श्रुति:—यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णमासमचातुर्मास्यमनाग्रयणमतिथिवर्जितं च।**
**अहुतमवैश्वदेवमविधिना हुतमासप्तमांस्तस्य लोकान्हिनस्ति ॥ ३ ॥**

**अर्थ**—ज्या अग्निहोत्र्याचें अग्निहोत्र दर्श, पौर्णमास, चातुर्मास्य, आग्रयण, या कर्मांनीं रहित, त्याचप्रमाणें अतिथिपूजनरहित तसेंच योग्यसमयीं हवन न केलेलें, वैश्वदेवकर्म-रहित व अविधीनें हवन केलेलें असतें त्याचें तें अग्निहोत्र जणुंकाय त्याच्या सात पुरुषांचा नाश करितें. ३.

**भाष्यं—एष सम्यगाहुतिप्रक्षेपादिलक्षण: कर्ममार्गो लोकप्राप्तये पन्थास्तस्य च सम्यक्करणं दुष्करम् । विपत्तयस्त्वनेका भवन्ति । कथं । यस्याग्निहोत्रिणोऽग्निहोत्रमदर्शं दर्शाख्येन कर्मणा वर्जितम् । अग्निहोत्रिणोऽवश्यकर्तव्यत्वाद्दर्शस्य । अग्निहोत्रसंबन्ध्यग्निहोत्रविशेषणमिव भवति । तदक्रियमाणमित्येतत् । तथाऽपौर्णमासमित्यादिष्वप्यग्निहोत्रविशेषणत्वं द्रष्टव्यम् । अग्निहोत्राङ्गत्वस्याविशिष्टत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—आहुतींचा यथाविधि त्याग करणें, इत्यादिलक्षण हा कर्ममार्ग लोक-प्राप्तीसाठीं उपाय आहे. पण त्याचें यथाशास्त्र अनुष्ठान दुष्कर आहे. त्यांत अनेक विपत्ती होतात. त्या कशा तें पहा—' **यस्य** '—ज्या अग्निहोत्र्याचें ' अग्निहोत्र दर्शसंज्ञक कर्मानें रहित असतें,' कारण अग्निहोत्र्याला दर्श अवश्य कर्तव्य असतो. दर्श अग्निहोत्राचें अंग जरी नसला तरी तो यावज्जीव करण्याविषयीं विधान असल्यामुळें अग्निहोत्रसंबंधी आहे आणि अग्निहोत्राशीं संबंध ठेवणारा असल्यामुळें जणुंकाय तो अग्निहोत्राचें विशे-षण होतो. जो अग्निहोत्री तें दर्शकर्म करीत नाहीं, असा याचा इत्यर्थ. त्याचप्रमाणें 'अपौर्णमासं' इत्यादिकहि अग्निहोत्राचीं विशेषणें आहेत, असें समजावें. कारण अग्निहो-त्राचें अंगत्व त्या सर्वांच्या ठिकाणीं समान आहे.

**भाष्यं—अपौर्णमासं पौर्णमासकर्मवर्जितम् । अचातुर्मास्यं चातुर्मास्यकर्म-वर्जितम् । अनाग्रयणमाग्रयणं शरदादिकर्तव्यं तच्च न क्रियते यस्य । तथाऽतिथि-**

**वर्जितं चातिथिपूजनं चाहन्यहन्याक्रियमाणं यस्य । स्वयं सम्यगग्निहोत्रकालेऽहुतम् । अदर्शादिवदवैश्वदेवं वैश्वदेवकर्मवर्जितं हूयमानमप्यविधिना हुतं न यथाहुतमित्येतत् ॥**

**भाष्यार्थ**—'**अपौर्णमासं**' म्हणजे पौर्णमास कर्मरहित, तसेंच '**अचातुर्मास्यं**'—चातुर्मास्य कर्मरहित, '**अनाग्रयणं**'—शरदादि ऋतूंत नूतन अन्नानें अवश्य कर्तव्य असलेलें कर्म आग्रयण होय. तें जो अग्निहोत्री करीत नाहीं, '**अतिथिवर्जितं च**'—त्याच-प्रमाणें प्रतिदिवशीं केलें जाणारें आतिथिपूजन जो अग्निहोत्री करीत नाहीं; तसेंच '**अहुतं**'—अग्निहोत्रसमयीं ज्याचें अग्निहोत्र स्वतः अग्निहोत्र्याकडून चांगल्या प्रकारें हवन केलें गेलेलें नसतें, '**अवैश्वदेवं**'—ज्याचें अग्निहोत्र दर्शादिकांप्रमाणेंच वैश्वदेवकर्मरहित आहे, '**अविधिना हुतं**'—ज्याचें अग्निहोत्र हवन केलें जात असलें तरी अविधीनें हुत केलें जात असल्यामुळें तें यथाहुत नाहीं, असा भावार्थ. [तें त्याच्या सप्त लोकांचा जणुं काय घात करीतें, असा पुढें संबंध. ]

**भाष्यं—एवं दुःसंपादितमसंपादितमग्निहोत्राद्युपलक्षितं कर्म किं करोतीत्युच्यते । आसप्तमान्सप्तमसहितांस्तस्य कर्तुर्लोकान्हिनस्ति हिनस्तीवाऽऽयासमात्रफलत्वात् । सम्यक्क्रियमाणेषु हि कर्मसु कर्मपरिणामानुरूपेण भूरादयः सत्यान्ताः सप्त लोकाः फलं प्राप्यन्ते । ते लोका एवंभूतेनाग्निहोत्रादिकर्मणा त्वप्राप्यत्वाद्धिंस्यन्त इवाऽऽयासमात्रं त्वव्यभिचारीत्यतो हिनस्तीत्युच्यते ॥**

**भाष्यार्थ**—'**एवं**'—येणेंप्रमाणें दुःसंपादन केलेलें अथवा मुळींच न संपादिलेलें अग्निहोत्रादिकांवरून उपलक्षित होणारें सर्व कर्म काय करतें तें मंत्र सांगतो—'**आसप्तमान् तस्य लोकान् हिनस्ति**'—त्या कर्मकर्त्या पुरुषाच्या सातव्या सत्यलोकासह सर्व लोकांस तें कर्म जणुंकाय नाहींसें करतें. कारण केवल आयास हेंच त्यांचें फल मिळतें. कर्मांचें अनुष्ठान यथाशास्त्र केलें असतां कर्मांच्या परिणामानुसार भूर्लोकापासून सत्यलोकापर्यंत असलेले सात लोक हें फल मिळविलें जातें, पण अशा प्रकारच्या अग्निहोत्रादि कर्मांच्या योगानें ते लोक दुर्लभ असल्यामुळें जणुंकाय मारले जातात. नुस्ते आयास होणें, हें मात्र त्यांचें अव्यभिचारी—निश्चित फल आहे. एवढ्यासाठीं '**हिनस्ति**' म्हणजे तें कर्म त्या लोकांस मारतें, असें म्हटलें जातें.

**भाष्यं—पिण्डदानाद्यनुग्रहेण वा संबध्यमानाः पितृपितामहप्रपितामहाः पुत्रपौत्रप्रपौत्राः स्वात्मोपकाराः सप्त लोका उक्तप्रकारेणाग्निहोत्रादिना न भवन्तीति हिंस्यन्त इत्युच्यते ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—किंवा पिंडदानादि अनुग्रहानें यजमानाशीं त्याचा पिता, पितामह व प्रपितामह असे तीन पूर्वज आणि पुत्र, पौत्र व प्रपौत्र असे तीन पुढचे पुरुष संबद्ध असतात. त्या पूर्वोत्तर पुरुषांच्यामध्यें असणारा सातवा यजमान पितरांवर पिंड व उदक यांच्या दानानें आणि पुत्रादिकांवर अन्न व वस्त्र यांच्या दानानें उपकार करतो. पण वर सांगितलेल्या प्रकारच्या अग्निहोत्रादि कर्मानें त्याला ते स्वात्मोपकारभूत सात लोक होत नाहींत. यास्तव ते नाहींसे केले जातात, असें म्हटलें जातें. ३.

**श्रुतिः—काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा ।**
**स्फुलिङ्गिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्त जिह्वाः ॥४॥**

**अर्थ**—काली, कराली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा, स्फुलिंगिनी व विश्वरुची देवी अशा या चलन पावणाऱ्या अग्नीच्या सात जिह्वा आहेत. ४.

**भाष्यं—काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा स्फुलिङ्गिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्त जिह्वाः । काल्याद्या विश्वरुच्यन्ता लेलायमाना अग्नेर्हविराहुतिग्रसनार्था एताः सप्त जिह्वाः ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—काली, कराली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा, स्फुलिंगिनी व देवी विश्वरुची अशा अग्नीच्या हविर्द्रव्याच्या आहुतींचा ग्रास करण्यासाठीं लोल–चंचल झालेल्या सात जिह्वा आहेत. ४.

**श्रुतिः—एतेषु यश्चरते भ्राजमानेषु यथाकालं चाऽऽहुतयो ह्याददायन् ।**
**तं नयन्त्येताः सूर्यस्य रश्मयो यत्र देवानां पतिरेकोऽधिवासः ॥५॥**

**अर्थ**—जो अग्निहोत्री दीप्त होणाऱ्या या सात अग्निजिह्वाभेदांमध्यें यथाकालीं आहुत्या देत अग्निहोत्रादि कर्म करतो त्याला त्या सूर्याचे किरण होऊन ज्या स्वर्गांत देवांचा मुख्य पति राहतो त्यांत नेतात. ५.

**भाष्यं—एतेष्वग्निजिह्वाभेदेषु योऽग्निहोत्री चरते कर्माऽऽचरत्यग्निहोत्रादि भ्राजमानेषु दीप्यमानेषु । यथाकालं च यस्य कर्मणो यः कालस्तत्कालं यथाकालं यजमानमाददायन्नाददाना आहुतयो यजमानेन निर्वर्तितास्तं नयन्ति प्रापयन्त्येता आहुतयो या इमा अनेन निर्वर्तिताः सूर्यस्य रश्मयो भूत्वा रश्मिद्वारैरित्यर्थः । यत्र यस्मिन्स्वर्गे देवानां पतिरिन्द्र एकः सर्वानुपर्यधिवसतीत्याधिवासः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—'**एतेषु भ्राजमानेषु**'—हे अग्नीचे जिह्वाभेद दीप्त होत असतांना त्यांमध्यें '**यः**'—जो अग्निहोत्री '**यथाकालं**'—ज्या कर्माचा जो विहित काल आहे, त्याच कालीं '**चरत**'—अग्निहोत्रादि कर्म करतो '**तं**'—त्या यजमानाला '**आददायन् आहुतयः**'—त्यानें दिलेल्या आहुत्या '**सूर्यस्य रश्मयः**'—सूर्याच्या किरणरूप होऊन–किरणद्वारांनीं

'**यत्र देवानां पतिः**'–ज्या स्वर्गामध्यें देवांचा स्वामी इंद्र '**एकः अधिवासः**'–सर्वांहून वरिष्ठ होऊन निवास करीत आहे त्या स्वर्गास नेतात. यजमानानें दिलेल्या आहुत्या सूर्यकिरणांच्या द्वारा त्याला स्वर्गास पोंचवितात, असा याचा इत्यर्थ. ५.

**श्रुतिः—एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्ति ।**
**प्रियां वाचमभिवदन्त्योऽर्चयन्त्य एष वः पुण्यः सुकृतो ब्रह्मलोकः ॥६॥**

**अर्थ**—दीप्तिमंत, पूजा करणाऱ्या व हा तुमचा पुण्य, सुकृत ब्रह्मलोक आहे अशी स्तुतिरूप प्रियवाणी उच्चारणाऱ्या त्या आहुत्या त्या यजमानाला सूर्याच्या किरणांच्या द्वारा 'ये ये' असें म्हणत नेतात. ६.

**भाष्यं—कथं सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्तीत्युच्यत एह्येहीत्याह्वयन्त्यः । सुवर्चसो दीप्तिमत्यः । किं च प्रियामिष्टां वाचं स्तुत्यादिलक्षणामाभिवदन्त्य उच्चारयन्त्योऽर्चयन्त्यः पूजयन्त्यश्चैष वो युष्माकं पुण्यः सुकृतः पन्था ब्रह्मलोकः फलरूपः । एवं प्रियां वाचमभिवदन्त्यो वहन्तीत्यर्थः । ब्रह्मलोकः स्वर्गः प्रकरणात् ॥६**

**भाष्यार्थ**—'**आहुतयः**'–त्या आहुत्या '**सूर्यस्य रश्मिभिः**'–सूर्याच्या किरणांच्या द्वारा '**यजमानं**'–यजमानाला कशा नेतात, तें या मंत्रांत सांगितलें आहे. '**एहि एहि०**'–'ये ये' असें म्हणून त्याला बोलावणाऱ्या '**सुवर्चसः**'–अतिशय दीप्तिमान् असलेल्या आणि '**प्रियां वाचं अभिवदन्त्यः**'–स्तुत्यादिरूप इष्टवाणी बोलणाऱ्या–उच्चारणाऱ्या '**अर्चयन्त्यः**'–आणि त्याची पूजा करणाऱ्या अशा होत्सात्या त्या '**एषः वः पुण्यः सुकृतः ब्रह्मलोकः**'–हा पहा तुमचा ब्रह्मलोकसंज्ञक फलरूप पुण्य सुकृत मार्ग आहे, असें तोंडानें म्हणतात. [ कारण ही स्तुतिरूप वाणी त्यांना फार प्रिय असते. त्या यजमानाची पूजाहि करितात. सारांश–]='**एवं०**'–याप्रमाणें प्रिय वाणी बोलणाऱ्या त्या, त्या यजमानास ब्रह्मलोकाला नेतात, असा याचा इत्यर्थ. हें प्रकरण अपरविद्येचें असल्यामुळें येथें ब्रह्मलोक म्हणजे स्वर्ग समजावा. ६.

**श्रुतिः—प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ।**
**एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापि यन्ति ॥७॥**

**अर्थ**—ज्यांच्यामध्यें निकृष्ट कर्म सांगितलें आहे ते हे अठरा यज्ञरूप अदृढ प्लव–विनाशी आहेत. पण जे मूढ हेंच श्रेय आहे, असें म्हणून त्याचें अभिनंदन करितात ते पुनरपि जरा व मृत्यु यांस प्राप्त होतात. ७.

**भाष्यं—एतच्च ज्ञानरहितं कर्मैतावत्फलमविद्याकामकर्मकार्यमतोऽसारं दुःखमूलमिति निन्द्यते । प्लवा विनाशिन इत्यर्थः । हि यस्मादेतेऽदृढा अस्थिरा यज्ञरूपा यज्ञस्य रूपाणि यज्ञरूपा यज्ञनिर्वर्तका अष्टादशाष्टादशसंख्याकाः षोडश-**

र्त्विजः पत्नी यजमानश्चेत्यष्टादश। एतदाश्रयं कर्मोक्तं कथितं शास्त्रेण । येष्व-ष्टादशस्ववरं केवलं ज्ञानवर्जितं कर्म ॥

**भाष्यार्थ**—हें ज्ञानरहित कर्म इतकेंच फल देणारें आहे. तें अविद्या, काम व कर्म यांचें कार्य आहे. त्यामुळें असार व दुःखाचें मूळ आहे. म्हणून या मंत्रांत त्याची निंदा केली जात आहे. '**प्लवाः**'—म्ह० विनाशी असा भावार्थ. '**हि**'—कारण '**एते अदृढाः यज्ञरूपाः अष्टादश**'—हे अस्थिर यज्ञरूप—यज्ञाचीं रूपें—यज्ञ करणारे अठरा सोळा ऋत्विज, यजमान व पत्नी असे अठरा विनाश पावणारे आहेत. [ कारण ते अस्थिर आहेत असा संबंध—]=शास्त्रानें यांच्या आश्रयानें असलेलें कर्म सांगितलें आहे. त्या अठराजणांमध्यें ज्ञानरहित कर्मच असतें.

**भाष्यं**—अतस्तेषामवरकर्माश्रयाणामष्टादशानामदृढतया प्लवत्वात्प्लवते सह फलेन तत्साध्यं कर्म । कुण्डविनाशादिव क्षीरदध्यादीनां तत्स्थानां नाशः । यत एवमेतत्कर्म श्रेयः श्रेयःकरणमिति येऽभिनन्दन्त्यभिहृष्यन्त्यविवेकिनो मूढा अत-स्ते जरां च मृत्युं च जरामृत्युं किंचित्कालं स्वर्गे स्थित्वा पुनरेवापि यान्ति भूयोऽ-पि गच्छन्ति ॥ ७ ॥

**भाष्यार्थ**—' अतः० '—म्हणून ते अवर—ज्ञानरहित कर्मांचे आश्रयभूत अठराजण अदृढ—अस्थिर असल्यामुळें नाश पावतात. ते नाश पावले म्हणजे त्यांच्या अनुष्ठानानेंच साध्य होणारें कर्महि फलासह नाश पावतें. भांडें फुटलें असतां त्यांतील दहीं, दूध इत्यादि जसें नाश पावतें त्याचप्रमाणें त्यांच्या आश्रयानें राहणारीं कर्में विनाश पावतात. पण असें असतांनाहि '**एतत् श्रेयः**'—हें कर्मच श्रेयस्कर आहे, असें समजून '**ये मूढाः अभिनन्दन्ति**'—जे अविवेकी मूढ अतिशय हृष्ट होतात '**ते पुनरेव अपि जरामृत्युं यान्ति**' —ते त्या हर्षामुळेंच, कांहीं काल स्वर्गांत राहून पुनरपि जरा व मृत्यु यांस प्राप्त होतात. ७

**श्रुतिः**—अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितंमन्यमानाः ।
जङ्घन्यमानाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथाऽन्धाः ॥ ८ ॥

**अर्थ**—अविद्येमध्यें राहणारे व स्वतःला मोठे बुद्धिमान् पंडित मानणारे मूढ अंधां-कडून नेल्या जाणाऱ्या—अंधांप्रमाणें पीडित होत्साते भ्रमण करितात. ८.

**भाष्यं**—किंचाविद्यायामन्तरे मध्ये वर्तमाना अविवेकप्रायाः स्वयं वयमेव धीरा धीमन्तः पंडिता विदितवेदितव्याश्चेति मन्यमाना आत्मानं संभावयन्तस्ते च जङ्घन्यमाना जरारोगाद्यनेकानर्थव्रातैर्हन्यमाना भृशं पीड्यमानाः परियन्ति विभ्रमन्ति मूढाः । दर्शनवर्जितत्वादन्धेनैवाचक्षुष्केणैव नीयमानाः प्रदर्श्यमान-मार्गा यथा लोकेऽन्धा अक्षिरहिता गर्तकण्टकादौ पतन्ति तद्वत् ॥ ८ ॥

**भाष्यार्थ**—शिवाय 'अविद्येमध्यें राहणारे'—अविवेकप्रचुर पण 'स्वतःच' आपल्याला—आम्ही मोठे 'बुद्धिमान् पंडित'—आम्हांला सर्व ज्ञातव्य ज्ञात झालें आहे, असें समजणारे ते 'मूढ' '**जंघन्यमानाः**' जरा, रोग इत्यादि अनेक अनर्थसमूहांनीं अतिशय पीडले जाणारे असे होत्साते '**परियन्ति**'—संसारभर भ्रमण करीत राहतात. '**यथा अन्धेन एव नीयमानाः अन्धाः**'—स्वतः दृष्टिहीन असल्यामुळें नेत्रहीन पुरुषाकडूनच मार्ग दाखविले जाणारे अंध जन जसे या व्यवहारांत खळगे, कांटे इत्यादिकांत पडतात तशीच वरील मूढांची दशा होते ८.

**श्रुति—अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यान्ति बालाः ।**
**यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनाऽऽतुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥ ९ ॥**

**अर्थ**—अविद्येमध्यें बहुधा असणारे ते मूढ आम्ही कृतार्थ आहों, असा अभिमान धरितात. ज्याअर्थीं अशा रीतीनें कर्मठ लोक कर्मफलाविषयींच्या कामनेमुळें तत्त्व जाणत नाहींत त्याअर्थीं ते दुःखार्त होऊन ज्याचें कर्मफल क्षीण झालें आहे, असे होत्साते स्वर्गातून च्युत होतात. ९

**भाष्यं—किंचाविद्यायां बहुधा बहुप्रकारं वर्तमाना वयमेव कृतार्थाः कृतप्रयोजना इत्येवमभिमन्यन्त्यभिमानं कुर्वन्ति बाला अज्ञानिनः । यद्यस्मादेवं कर्मिणो न प्रवेदयन्ति तत्त्वं न जानन्ति रागात्कर्मफलरागाभिभवनिमित्तं तेन कारणेनाऽऽतुरा दुःखार्ताःसन्तःक्षीणलोकाः क्षीणकर्मफलाः स्वर्गलोकाच्च्यवन्ते॥**

**भाष्यार्थ**—शिवाय'अविद्येमध्यें अनेक प्रकारें रहाणारे ते अज्ञ आम्हींच कृतार्थ आहों,' —आम्ही आपलें सर्व प्रयोजन संपादन केलें आहे, 'असा अभिमान करितात.' पण '**यत्०**' ज्याअर्थीं ते कर्मफलाच्या अभिलाषानें विवेकशक्ति कुंठित झाल्यामुळें तत्त्व जाणत नाहींत त्याअर्थीं ते आतुर—दुःखार्त होत्साते कर्मफल क्षीण होतांच स्वर्गलोकांतून च्युत होतात. ९

**श्रुतिः—इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः ।**
**नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशान्ति ॥१०॥**

**अर्थ**—इष्टापूर्त कर्माला श्रेष्ठ मानणारे ते अत्यंत मूढ त्याहून दुसरें कांहीं श्रेयस्कर आहे, असें समजतच नाहींत. ते स्वर्गावरील उत्कृष्ट शरीरांत कर्मफलाचा अनुभव घेऊन या किंवा याहून अत्यंत हीन लोकांत प्रवेश करितात. १०.

**भाष्यं—इष्टापूर्तम् । इष्टं यागादि श्रौतं कर्म । पूर्तं वापीकूपतडागादि स्मार्तं मन्यमाना एतदेवातिशयेन पुरुषार्थसाधनं वरिष्ठं प्रधानमिति चिन्तयन्तोऽन्यदात्मज्ञानाख्यं श्रेयःसाधनं न वेदयन्ते न जानन्ति प्रमूढाः पुत्रपशुबन्ध्वादिषु प्रमत्ततया मूढास्ते च नाकस्य स्वर्गस्य पृष्ठ उपरिस्थाने सुकृते भोगायतनेऽनुभू-**

**त्वाऽनुभूय कर्मफलं पुनरिमं लोकं मानुषमस्माद्धीनतरं वा तिर्यङ्नरकादिलक्षणं यथाकर्मशेषं विशन्ति ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**–**'इष्टापूर्तं'**–यागादि श्रौत कर्म हें इष्ट; वापी-कूप-तडागादि लोकोपकारक वस्तु निर्माण करून त्यांचा लोकोपभोगार्थ उत्सर्ग करणें हें स्मार्त पूर्त कर्म; या दोन प्रकारच्या कर्मांलाच **'वरिष्ठं'**–सर्वोत्तम पुरुषार्थसाधन **'मन्यमानाः'**–समजणारे इष्टापूर्त कर्म हेंच अतिशय प्रधान पुरुषार्थसाधन आहे, असें चिंतन करणारे **'प्रमूढाः'**–अतिशय मूढ **'अन्यत् श्रेयः न वेदयन्ते'**–आत्मज्ञानसंज्ञक दुसरें श्रेयःसाधन जाणत नाहींत. पुत्र-पशु-बंधु इत्यादिकांविषयीं अतिशय मत्त झाल्या कारणानें विवेकहीन बनलेले ते **'नाकस्य पृष्ठे'**–स्वर्गाच्या पृष्ठभागीं **'सुकृते'**–उत्तम शरीरांत प्रवेश करून **'अनुभूत्वा'**–कर्मांचें फल भोगून व पुनः **'इमं लोकं'**–या मानुष लोकांत **'हीनतरं वा'**–अथवा याहून अधिक हीन पश्वादि तिर्यक्-नरक इत्यादि लक्षण–लोकांत 'प्रवेश करितात.' १०

**श्रुति—तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः ।**
**सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा॥११**

**अर्थ**—पण जे शांत व विद्वान् भैक्षचर्या आचरीत अरण्यांत राहतात आणि तप व श्रद्धा म्ह० स्वाश्रमविहित कर्म व उपासना यांचें सेवन करतात ते पापरहित होऊन सूर्यद्वारानें–उत्तरायणमार्गानें जेथें तो अव्ययस्वरूप अमृत पुरुष आहे तेथें जातात. ११

**भाष्यं—ये पुनस्तद्विपरीता ज्ञानयुक्ता वानप्रस्थाः संन्यासिनश्च तपःश्रद्धे हि तपः स्वाश्रमविहितं कर्म । श्रद्धा हिरण्यगर्भादिविषया विद्या ते तपःश्रद्धे उपवसन्ति सेवन्तेऽरण्ये वर्तमानाः सन्तः । शान्ता उपरतकरणग्रामाः । विद्वांसो गृहस्थाश्च ज्ञानप्रधाना इत्यर्थः । भैक्ष्यचर्यां चरन्तः परिग्रहाभावादुपवसन्त्यरण्य इति संबन्धः सूर्यद्वारेण सूर्योपलक्षितेनोत्तरायणेन पथा ते विरजा विरजसः क्षीणपुण्यपापकर्माणः सन्त इत्यर्थः । प्रयान्ति प्रकर्षेण यान्ति यत्र यस्मिन्सत्यलोकादावमृतः सः पुरुषः प्रथमजो हिरण्यगर्भो ह्यव्ययात्माऽव्ययस्वभावो यावत्संसारस्थायी । एतदन्तास्तु संसारगतयोऽपरविद्यागम्याः ॥**

**भाष्यार्थ**—( केवल कर्मठांना कोणतें फल मिळतें तें सांगून आतां सगुण ब्रह्माच्या उपासनेसह आश्रम कर्में करणारांना संसारविषयक फलच सांगतात–)=पण **'ये'**–जे यांहून विपरीत असलेले ज्ञानयुक्त वानप्रस्थ व संन्यासी **'अरण्ये'**–अरण्यांत राहून **'तपःश्रद्धे'** –तप म्हणजे स्वाश्रमविहित कर्म व श्रद्धा–हिरण्यगर्भादि देवताविषय विद्या–उपासना, **'उपवसन्ति'**–यांचें सेवन करितात; **'शान्ताः'**–जे शांत म्हणजे ज्यांचा इंद्रियसंघ उपरत झाला आहे असे आहेत, **'विद्वांसः'**–आणि जे ज्ञानप्रधान गृहस्थ परिग्रहाचा

त्याग केल्यामुळे **'भैक्ष्यचर्यां चरन्तः'**—भिक्षाचरण करून—अरण्यांत राहतात, असा संबंध. **'ते विरजाः'**—ते ज्यांचें पुण्य-पाप कर्म क्षीण झालें आहे, असे होत्साते **'सूर्यद्वारेण'** —सूर्यद्वारानें म्हणजे सूर्योपलक्षित उत्तरायण मार्गानें **'यत्र सः अव्ययात्मा अमृतः पुरुषः'**—ज्या सत्य लोकादिकांमध्यें तो अव्ययस्वभाव—संसार असेपर्यंत राहणारा, अमृत, हिरण्यगर्भाख्य, प्रथम प्रकट झालेला पुरुष असतो तेथें जातात. अपर-विद्येच्या योगानें प्राप्त होणाऱ्या संसारगती येथवरच आहेत. (येथील अरण्य म्हणजे स्त्रीजनांनीं व्याप्त नसलेला देश.)

**भाष्यं—ननु—एतं मोक्षमिच्छन्ति केचित्। न। इहैव सर्वे प्रविलीयन्ति कामास्ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाविशन्तीत्यादिश्रुतिभ्यो-प्रकरणाच्च। अपरविद्याप्रकरणे हि प्रवृत्ते न ह्यकस्मान्मोक्षप्रसङ्गोऽस्ति। विर-जस्त्वं त्वापेक्षिकं। समस्तमपरविद्याकार्यं साध्यसाधनलक्षणं क्रियाकारकफल-भेदभिन्नं द्वैतं एतावदेव यद्धिरण्यगर्भप्राप्त्यवसानम्। तथा च मनुनोक्तं स्थाव-राद्यां संसारगतिमनुक्रामता "ब्रह्मा विश्वसृजो धर्मो महानव्यक्तमेव च। उत्तमां सात्त्विकीमेतां गतिमाहुर्मनीषिणः" इति॥ ११॥**

**भाष्यार्थ—(शंका—)'ननु एतं०'**—अहोपण, हाच मोक्ष आहे, असें कित्येक समजतात. **(समाधान—)'न०'**—तसें समजणें युक्त नव्हे. कारण **'इहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः'** —येथेंच त्यांचें सर्वकाम विलीन होतात, **'ते सर्वगं सर्वतःप्राप्य धीरा युक्तात्मानःसर्व-मेवाविशन्ति'**—ते धीमान्—विद्वान् युक्तात्मे सर्वव्यापी ब्रह्माला सर्वतः प्राप्त होऊन सर्वांतच प्रवेश करितात, इत्यादि श्रुती पुढें मुक्तांच्या सर्व कामना येथेंच लीन होतात व त्यांना येथेंच सर्वात्मभाव प्राप्त होतो, असें सांगतात. (शिवाय ब्रह्मलोकप्राप्ति हें देशानें मर्यादित झालेलें फल आहे. यास्तव तो मोक्ष नव्हे—)=**'अप्रकरणात् च'**—त्याचप्रमाणें हें मोक्षाचें प्रकरणहि नव्हे. **'अपरविद्या०'**—अपरविद्येचें प्रकरण चाललें असतांना त्यांत अकस्मात् मोक्षप्रसंग येणें युक्त नव्हे. **'विरजस्त्वं०'**—या मंत्रांत सांगितलेलें विरजस्त्व म्हणजे पुण्य-पापकर्मराहित्य हें आपेक्षिक आहे. (आपेक्षिक म्हणजे इतर जीवांच्या अपेक्षेनें अधिक शुद्धि; पण अत्यंत शुद्धि नव्हे—)=**'समस्तं०'**—अपर विद्येचें समस्त कार्य साध्य-साधनरूप, क्रिया-कारक-फल या भेदानें भिन्न व द्वैतरूप असून तेंहि एव-ढेंच म्हणजे हिरण्यगर्भप्राप्तीपर्यंतच आहे. **'तथा च०'**—स्थावरभावापासून पुढील सर्व संसारगति सांगण्यास आरंभ करणाऱ्या मनूनें—'चतुर्मुख, मरीचिप्रभृति प्रजापति, यम, सूत्रात्मा व त्रिगुणात्मिका प्रकृति, ही उत्तम सात्त्विकी—सत्त्वपरिणामरूप ज्ञानासह—उपासने-सह कर्मांची फलरूप गति आहे, असें विद्वान् सांगतात-म. १२.५०-असें सांगितलें आहे. ११

श्रुतिः—परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन ।
तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥१२॥

**अर्थ**—धर्माधर्मरूप कर्मांमुळें प्राप्त झालेल्या लोकांचें परीक्षण करून ब्राह्मणानें निर्वेदास म्ह० वैराग्यास प्राप्त व्हावें. या संसारांत अकृत पदार्थ नाहीं. तेव्हां मला कर्मानें काय करावयाचें आहे? (असें म्हणून) हातांत समिधा घेऊन नित्यपदाच्या साक्षात्काराकरितां त्यानें श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ गुरूपाशीं जावें. १२.

**भाष्यं**—अथेदानीमस्मात्साध्यसाधनरूपात्सर्वस्मात्संसाराद्विरक्तस्य परस्यां विद्यायामधिकारप्रदर्शनार्थमिदमुच्यते—परीक्ष्य यदेतदृग्वेदाद्यपरविद्याविषयं स्वाभाविक्यविद्याकामकर्मदोषवत्पुरुषानुष्ठेयमविद्यादिदोषवन्तमेव पुरुषं प्रति विहितत्वात्तदनुष्ठानकार्यभूताश्च लोका ये दक्षिणोत्तरमार्गलक्षणाः फलभूता ये च विहिताकरणप्रतिषेधातिक्रमदोषसाध्या नरकतिर्यक्प्रेतलक्षणास्तानेतान्परीक्ष्य प्रत्यक्षानुमानोपमानागमैः सर्वतो याथात्म्येनावधार्य ॥

**भाष्यार्थ**—त्यानंतर आतां साध्य-साधनरूप अशा या सर्व संसारापासून विरक्त झालेल्या पुरुषाचा पर विद्येमध्यें अधिकार आहे, असें दाखविण्याकरितां हें पुढें विधान केलें जात आहे. '**कर्मचितान् लोकान**'—हें जें ऋग्वेदादि अपर विद्येचा विषय झालेलें व अविद्यादि दोषवान् पुरुषास उद्देशूनच विधान केलेलें असल्यामुळें स्वाभाविक अविद्या, काम, कर्म या दोषांनीं युक्त असलेल्या पुरुषांकडूनच अनुष्ठान केलें जाणारें—त्यांनाच अनुष्ठेय असलेलें कर्म व उपासना आणि त्याचप्रमाणें त्या अनुष्ठानाच्या कार्यभूत—अनुष्ठानाच्या फलभूत म्हणजे अनुष्ठानाचें फल या रूपानें मिळणारे दक्षिणोत्तर मार्गलक्षण लोक आणि विहित कर्मांचें अनुष्ठान न केल्यामुळें व प्रतिषिद्ध कर्मांचें अनुष्ठान केल्यामुळें उद्भवणाऱ्या दोषांमुळें साध्य होणारे नरक, तिर्यक्, प्रेत इत्यादिरूप लोक यांचें '**परीक्ष्य**'—परीक्षण करून —प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व आगम या चार प्रमाणांच्या योगानें सर्व बाजूंनीं त्यांच्याविषयीं यथार्थ रूपानें निश्चय करून ब्राह्मणानें त्याविषयीं विरक्त व्हावें, असा पुढें संबंध. (पुत्रादि हें ऐहिक कर्मफल आहे. तें नाशाचा विषय कसें होतें, हें सर्वांना प्रत्यक्ष दिसतेंच. पारलौकिक कर्मफलाविषयीं—'तें अनित्य आहे; कृतक—कर्मजन्य असल्यामुळें—घटाप्रमाणें'—असें अनुमान करून त्याच्या नाशाचा निश्चय करावा. असो; सारांश अपर विद्येचा विषय असें कर्म व उपासना यांच्या फलभूत दक्षिणोत्तर मार्गांनीं प्राप्त होणाऱ्या दोन गती आणि शास्त्रविहित कर्म न करणें व शास्त्रनिषिद्ध आचरण करणें या दोषांमुळें प्राप्त होणारें नरकादि अनिष्ट फल, यांच्या अनित्यत्वादिकांविषयी चांगला विचार करून ब्राह्मणानें विरक्त व्हावें.)

**भाष्यं—लोकान्संसारगतिभूतानव्यक्तादिस्थावरान्तान्व्याकृताव्याकृतलक्षणान्बीजाङ्कुरवदितरेतरोत्पत्तिनिमित्ताननेकानर्थशतसहस्रसंकुलान्कदलीगर्भवदसारान्मायामरीच्युदकगन्धर्वनगराकारस्वप्नजलदबुद्बुदफेनसमान्प्रतिक्षणप्रध्वंसान्पृष्ठतः कृत्वाऽविद्याकामदोषप्रवर्तितकर्मचितान्धर्माधर्मनिर्वर्तितानित्येतत्। ब्राह्मणस्यैव विशेषतोऽधिकारः सर्वत्यागेन ब्रह्मविद्यायामिति ब्राह्मणग्रहणम्॥**

**भाष्यार्थ**—हे सर्व लोक म्हणजे कर्मांचीं फलें संसारगतिभूत, अव्यक्तापासून स्थावरापर्यंत व्यक्त-अव्यक्तलक्षण, बीज व अंकुर यांप्रमाणें परस्परांच्या उत्पत्तीस निमित्त होणारे, हजारों अनर्थांनीं व्याप्त, केळीच्या अन्तर्भागाप्रमाणें असार, माया, मृगजल, गंधर्वनगर इत्यादिकांच्या आकाराचे, स्वप्न, जलावरील बुडबुडे, फेंस यांसारखे व प्रतिक्षणीं ध्वंस पावणारे आहेत, असें समजून व त्यांना मागें सारून—त्यांच्या विषयींची आसक्ति सोडून हे सर्व अविद्या व काम, या दोषांमुळें प्रवृत्त होणाऱ्या कर्मांमुळें संपादन होणारे म्हणजे धर्माधर्मांमुळें प्राप्त होणारे आहेत, असें जाणून ब्राह्मणानें त्याविषयीं विरक्त व्हावें असा याचा अर्थ. सर्वस्वत्यागानें ब्रह्मविद्येमध्यें विशेषतः ब्राह्मणाचाच अधिकार असल्यामुळें येथें 'ब्राह्मण' या शब्दाचें ग्रहण केलें आहे. (एकता, समता, सत्यता, शील, स्थिति, दंडनिधान, निग्रह, मनाचा सरळपणा व सर्व क्रियांपासून उपरम यांसारखें ब्राह्मणाचें दुसरें वित्त नाहीं, अशा अर्थाची स्मृति असल्यामुळें ब्राह्मणाचाच तिच्यामध्यें अधिकार आहे, असें ठरतें.)

**भाष्यं—परीक्ष्य लोकान्किं कुर्यादित्युच्यते—निर्वेदं निःपूर्वो विदिरत्र वैराग्यार्थे वैराग्यमायात्कुर्यादित्येतत्। स वैराग्यप्रकारः प्रदर्श्यते। इह संसारे नास्ति कश्चिदप्यकृतः पदार्थः। सर्वे एव हि लोकाः कर्मचिताः कर्मकृतत्वाच्चानित्याः। न नित्यं किंचिदस्तीत्यभिप्रायः॥**

**भाष्यार्थ**—वर सांगितल्याप्रमाणें सर्व लोक (कर्मफलें) अनित्य आहेत, असा—'या लोकीं कर्मार्जित लोक जसा क्षीण होतो त्याप्रमाणें परलोकीं पुण्यकृत लोकहि क्षय पावतो' इत्यादि आगम व वर दाखविलेलीं प्रत्यक्ष व अनुमान हीं दोन प्रमाणें यांच्या योगानें—पूर्ण निश्चय करून नंतर ब्राह्मणानें काय करावें तें सांगितलें जातें '**ब्राह्मणः निर्वेदं आयात्**'—त्यानें निर्वेद करावा. येथें 'निर्' या उपसर्गपूर्वक 'विद्' हा धातु वैराग्य या अर्थी आहे. यास्तव त्यानें वैराग्यास प्राप्त व्हावें, वैराग्य करावें, असा त्याचा इत्यर्थ. आतां त्या वैराग्याचा प्रकार मंत्र दाखवितो. या संसारांत '**अकृतः नास्ति**'—अकृत पदार्थ एकहि नाहीं. सर्वच लोक कर्मचित आहेत. कर्मचित म्हणजे कर्मकृत—कर्मानें संपादन केलेले; आणि कर्मचित असल्यामुळें अनित्य आहेत. या संसारांत कांहीं एक नित्य नाहीं, असा याचा अभिप्राय.

**भाष्यं—सर्वं तु कर्मानित्यस्यैव साधनम्। यस्माच्चतुर्विधमेव हि सर्वं कर्म कार्यमुत्पाद्यमाप्यं संस्कार्यं विकार्यं वा नातःपरं कर्मणो विशेषोऽस्ति। अहं च नित्येनामृतेनाभयेन कूटस्थेनाचलेन ध्रुवेणार्थेनार्थी न तद्विपरीतेन। अतः किं कृतेन कर्मणाऽऽयासबहुलेनानर्थसाधनेनेत्येवं निर्विण्णोऽभयं शिवमकृतं नित्यं पदं यत्तद्विज्ञानार्थं विशेषेणाधिगमार्थं स निर्विण्णो ब्राह्मणो गुरुमेवाऽऽचार्यं शमदमदयादिसंपन्नमभिगच्छेत्॥**

**भाष्यार्थ**—पण सर्व कर्म अनित्य फलाचेंच साधन आहे. कारण सर्व कर्म—कार्य उत्पाद्य आप्य, संस्कार्य व विकार्य असें चार प्रकारचेंच आहे. कर्मांचा याहून आणखी अधिक विशेष—प्रकार नाहीं. पण मी तर नित्य, अमृत, अभय, परिणामरहित, स्पंदरहित व प्रयत्नरहित व ध्रुव अशा पदार्थांची इच्छा करणारा आहें. याहून विपरीत पदार्थांची इच्छा करणारा नाहीं. यास्तव ज्यांत आयासांचें बाहुल्य आहे व जें अनर्थांचें साधन आहे, अशा '**कृतेन**'—कृतानें—कर्मानें मला काय करावयाचें आहे, मला याचा काय उपयोग आहे? असें म्हणून '**सः**'—निर्विण्ण—विरक्त झालेल्या ब्राह्मणानें अभय, कल्याणमय, अकृत, म्हणूनच नित्य असें जें पद '**तद्विज्ञानार्थं**'—त्याच्या विज्ञानार्थ, विशेष ज्ञानार्थ '**गुरुं एव अभिगच्छेत्**'—शम-दम-दयादिसंपन्न आचार्यासच शरण जावें.

**भाष्यं—शास्त्रज्ञोऽपि स्वातन्त्र्येण ब्रह्मज्ञानान्वेषणं न कुर्यादित्येतद्गुरुमेवेत्यवधारणफलम्। समित्पाणिः समिद्भारगृहीतहस्तः श्रोत्रियमध्ययनश्रुतार्थसंपन्नं ब्रह्मनिष्ठं हित्वा सर्वकर्माणि केवलेऽद्वये ब्रह्मणि निष्ठा यस्य सोऽयं ब्रह्मनिष्ठो जपनिष्ठस्तपोनिष्ठ इति यद्वत्। न हि कर्मिणो ब्रह्मनिष्ठता संभवति कर्मात्मज्ञानयोर्विरोधात्। स तं गुरुं विधिवदुपसन्नः प्रसाद्य पृच्छेदक्षरं पुरुषं सत्यम्॥**

**भाष्यार्थ**—तो विरक्त ब्राह्मण स्वतः जरी शास्त्रज्ञ असला तरी त्यानें स्वतंत्रपणें ब्रह्मज्ञानाचा शोध करूं नये; हें 'गुरुमेव' म्ह० गुरूलाच येथील निश्चयार्थी 'एव' या अव्ययाचें निश्चलफल आहे. त्यानें '**समित्पाणिः**'—गुरूंच्या समीप जातांना हातांत समिधांचा भार घ्यावा. '**श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं**'—तो गुरु अध्ययन व शास्त्रार्थ यांनीं संपन्न ब्रह्मनिष्ठ असावा. सर्व कर्में सोडून केवल अद्वय ब्रह्मामध्येंच ज्याची निष्ठा आहे तो ब्रह्मनिष्ठ होय. जपनिष्ठ, तपोनिष्ठ, इत्यादिकांप्रमाणेंच ब्रह्मनिष्ठ हा शब्द आहे. कर्मठ पुरुषाची ब्रह्मनिष्ठता संभवत नाहीं. कारण कर्म व आत्मज्ञान यांचा विरोध आहे. असो; त्या ब्राह्मणानें असल्या गुरूपाशीं यथाविधि गमन करून व त्यांस प्रसन्न करून सत्य व अक्षर पुरुषाविषयीं प्रश्न करावा. (विनयाच्या उपलक्षणार्थ म्हणजे आपला विनय व्यक्त करण्याकरितां समिधा हातांत घेऊन जाण्याविषयीं वर सांगितलें आहे.) १२.

**श्रुतिः**—तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक्प्रशान्तचित्ताय शमान्विताय ।
येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् ॥ १३ ॥

॥ इति प्रथममुंडके द्वितीयः खंडः । प्रथममुंडकं समाप्तम् ॥

**अर्थ**—( याप्रमाणें शिष्य समीप आला असतां ) त्या विद्वान् गुरूनें त्या यथाशास्त्र समीप आलेल्या दर्पादिदोषरहित व शान्तियुक्त शिष्याला जिच्या योगानें तो अक्षर व नित्य पुरुषाला जाणील ती ब्रह्मविद्या तत्त्वतः सांगावी. १३. ( १.२. )

**भाष्यं**—तस्मै स विद्वानगुरुर्ब्रह्मविदुपसन्नायोपगताय । सम्यग्यथाशास्त्रमित्येतत् । प्रशान्तचित्तायोपरतदर्पादिदोषाय । शमान्विताय बाह्येन्द्रियोपरमेण च युक्ताय सर्वतो विरक्तायेत्येतत् । येन विज्ञानेन यया विद्यया परयाऽक्षरमद्रेश्यादिविशेषणं तदेवाक्षरं पुरुषशब्दवाच्यं पूर्णत्वात्पुरिशयनाच्च सत्यं तदेव परमार्थस्वाभाव्यादक्षरं चाक्षरणादक्षतत्वादक्षयत्वाच्च वेद विजानाति तां ब्रह्मविद्यां तत्त्वतो यथावत्प्रोवाच प्रब्रूयादित्यर्थः । आचार्यस्याप्ययं नियमो यन्न्यायप्राप्तसच्छिष्यनिस्तारणमविद्यामहोदधेः ॥ १३ ॥ ( १. २. )

**भाष्यार्थ**—'**स विद्वान्**'–त्या ब्रह्मवेत्त्या विद्वान् गुरूनें '**सम्यक् उपसन्नाय तस्मै**'–यथाशास्त्र समीप आलेल्या शांतचित्त म्हणजे ज्याचे दर्पादिदोष शांत झाले आहेत अशा व शमसंपन्न म्हणजे बाह्य इंद्रियांच्या उपरमानें युक्त असलेल्या सारांश सर्वतः विरक्त असलेल्या ब्राह्मणाला '**तत्त्वतः०**'–म्हणजे यथावत्–जशी असेल तशी 'ब्रह्मविद्या सांगावी.' '**येन०**'–ज्या विज्ञानानें–ज्या पर विद्येनें वर 'अद्रेश्यादि' विशेषणांनीं वर्णिलेलें, पूर्ण असल्यामुळें अथवा शरीरलक्षण पुरींत रहात असल्यामुळें 'पुरुष' या शब्दानें सांगितलें जाणारें, 'सत्य'–परमार्थ स्वभावामुळें, सत्यस्वभावामुळें सत्य, आणि क्षरणरहित, क्षतरहित व क्षयरहित असल्यामुळें 'अक्षर' अशा तत्त्वास तो विरक्त ब्राह्मण 'जाणील' '**तां ब्रह्मविद्यां तत्त्वतः प्रोवाच**'–ती ब्रह्मविद्या गुरूनें शिष्यास तत्त्वतः सांगावी, असा याचा इत्यर्थ. यथाशास्त्र व यथान्याय शरण आलेल्या सच्छिष्याचें अविद्यामहासागरांतून निस्तारण करणें, हा आचार्याकरितांहि येथें नियम केलेला आहे. ( अक्षर या पदाची व्युत्पत्ति वर तीन प्रकारें केली आहे. त्यांतील अवयवांचा विपरीत भाव होणें, त्यांच्यामध्यें परिणाम होणें हेंच क्षरण, शरीराचा नाश हेंच क्षत व विकार हाच क्षय होय. पण ब्रह्म निरवयव, अशरीर व निर्विकार असल्यामुळें क्षरण, क्षत व क्षय यांनीं रहित आहे, असा त्याचा भावार्थ जाणावा.) १३. [ प्रथम मुंडक समाप्त. ]

**श्रुतिः**—तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाःसहस्रशः प्रभवन्ते सरूपाः।
तथाक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापि यन्ति ॥ १ ॥

**अर्थ**—तें हें सत्य आहे. ज्याप्रमाणें अत्यंत दीप्त अग्नीपासून त्याच रूपाचे सहस्राधि विस्फुलिंग उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें हे प्रिय शिष्या, अक्षरापासून विविध भाव उत्पन्न होतात, व ते सर्व त्यांतच जाऊन मिळतात. १.

**भाष्यं**––**अपरविद्यायाः सर्वं कार्यमुक्तम् । स च संसारो यत्सारो यस्मान्मूळादक्षरात्संभवति यस्मिंश्च प्रलीयते तदक्षरं पुरुषाख्यं सत्यम् । यस्मिन्विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवति तत्परस्या ब्रह्मविद्याया विषयः स वक्तव्य इत्युत्तरो ग्रन्थ आरभ्यते ॥**

**भाष्यार्थ**—(दोन विद्या आहेत, असें जाणावें, असा उपन्यास करून त्यांतील अपर विद्येचा विस्तार प्रथम मुंडकांत केला. आतां वर संक्षेपतः निर्देश केलेल्या परविद्येचा विस्तार करण्यासाठीं या दुसऱ्या मुंडकाचा आरंभ केला जात आहे, असें भाष्यकार '**अपरविद्यायाः**०' या भाष्यानें सांगतात–)=अपर विद्येचें सर्व कार्य वर सांगितलें. तोच संसार होय. पण त्यांत जें सार आहे, ज्या अक्षर मूलापासून तो संभवतो, आणि तो ज्यांत सर्वथा लीन होतो तें पुरुषसंज्ञक अक्षर सत्य आहे. जें साक्षात् ज्ञात झालें असतां हें सर्व कार्यजात विशेषप्रकारें ज्ञात होतें तें अक्षर पर ब्रह्मविद्येचा विषय आहे. आतां या विषयाचेंच वर्णन करावें, म्हणून पुढचा ग्रंथ आरंभिला जात आहे.

**भाष्यं**––**यदपरविद्याविषयं कर्मफललक्षणं सत्यं तदापेक्षिकम् । इदं तु परविद्याविषयं परमार्थसल्लक्षणत्वात् तदेतत्सत्यं यथाभूतं विद्याविषयम् । अविद्याविषयत्वाच्चानृतमितरत् । अत्यन्तपरोक्षत्वात्कथं नाम प्रत्यक्षवत्सत्यमक्षरं प्रतिपद्येरन्निति दृष्टान्तमाह**––

**भाष्यार्थ**—(पहिल्या मुंडकाच्या पहिल्या खंडांत अपरविद्याविषयक कर्मफल सांगून दुसऱ्या खंडाच्या आरंभीं तें हें सत्य आहे, असें म्हटलें आहे. पण)=जें अपरविद्याविषयक कर्मफलरूप सत्य तें आपेक्षिक आहे. म्हणजे तें ऐहिक फलाच्या अपेक्षेनें अधिक काल टिकणारें आहे. पण हें परविद्याविषय फल परमार्थ सत्-लक्षण–अत्यंत अबाधित असल्यामुळें निरपेक्ष सत्य आहे. कारण हें यथार्थ विद्याविषय आहे; आणि दुसरें अविद्याविषय असल्यामुळें अनृत–मिथ्या होय. [विद्याविषय व अविद्याविषय म्हणजे विद्येचें व अविद्येचें असें जाणावें.]=“ब्रह्म केवल शास्त्रगम्य असल्यामुळें अत्यंत परोक्ष आहे. तेव्हां मुमुक्षु जन त्या सत्य अक्षराला घटादि प्रत्यक्षयोग्य पदार्थांप्रमाणें कसे जाणूं शकतील?” [कारण कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या पुण्य-पापसंज्ञक अदृष्टाप्रमाणें ब्रह्माचेंहि प्रत्यक्ष ज्ञान संभवत नाहीं; आणि कैवल्य तर त्याच्या साक्षात्काराधीन आहे,] =अशी शंका कोणाला राहूं नये, म्हणून जीव व ब्रह्म यांच्या एकत्वाविषयीं हा मंत्र दृष्टान्त देत आहे—

**भाष्यं—यथा सुदीप्तात्सुष्ठु दीप्तादिद्धात्पावकादग्नेर्विस्फुलिङ्गा अग्न्यवयवाः सहस्रशोऽनेकशः प्रभवन्ते निर्गच्छन्ति सरूपा अग्निसलक्षणा एव तथोक्तलक्षणादक्षराद्विविधा नानादेहोपाधिभेदमनुविधीयमानत्वाद्विविधा हे सोम्य भावा जीवा आकाशादिव घटादिपरिच्छिन्नाः सुषिरभेदा घटाद्युपाधिप्रभेदमनुभवन्ति। एवं नानानामरूपकृतदेहोपाधिप्रभवमनुप्रजायन्ते तत्र चैव तस्मिन्नेवाक्षरेऽपियन्ति देहोपाधिविलयमनुलीयन्ते घटादिविलयमन्विव सुषिरभेदाः ॥**

**भाष्यार्थ—'यथा सुदीप्तात्'**—ज्याप्रमाणें चांगल्या प्रकारें प्रदीप्त झालेल्या **'पावकात्'**—अग्नीपासून **'सरूपाः'**—अग्नीच्या लक्षणाचेच **'सहस्रशः विस्फुलिंगाः प्रभवन्ते'** सहस्रावधि—अनेक स्फुलिंग—अग्नीचे अवयव—किटाळें उद्भवतात त्याप्रमाणें वर सांगितलेल्या प्रकारच्या अक्षरापासून विविध भाव—अनेक देहरूप उपाधीच्या अनुसार भिन्न भिन्न झालेले भाव—म्हणजे जीव होतात. आकाशापासून घटादि उपाधींनीं मर्यादित झालेलीं छिद्रें घटादि उपाधिकृत स्पष्ट भेदाचा जसा अनुभव घेतात, स्पष्ट भेदास प्राप्त होतात, **'तथा'** —त्याप्रमाणें **'सोम्य'**—हे प्रियदर्शन शिष्या, **'अक्षरात्'**—अक्षरापासून **'विविधाः'**—नाना नाम-रूपांमुळें होणाऱ्या देहोपाधीच्या उत्पत्तीच्या मागोमाग विविध **'भावाः'**—जीव **'प्रजायन्ते'**—उत्पन्न होतात **'च तत्र एव अपियन्ति'**—आणि ते त्या अक्षरांतच देहोपाधीच्या लयाच्या मागोमाग लीन होतात. म्हणजे घटादिकांचा विलय—नाश होतांच त्यामुळें झालेलीं छिद्रें जशीं आकाशांत लीन होतात त्याप्रमाणें देहरूप उपाधीचा नाश होतांच जीवभावहि नाहींसा होतो.

**भाष्यं—यथाऽऽकाशस्य सुषिरभेदोत्पत्तिप्रलयनिमित्तत्वं घटाद्युपाधिकृतमेव तद्वदक्षरस्यापि नामरूपकृतदेहोपाधिनिमित्तमेव जीवोत्पत्तिप्रलयनिमित्तत्वम् ॥१**

**भाष्यार्थ—'यथा०'**—आकाश घटादि उपाधीमुळेंच जसें छिद्रादि भेदांच्या उत्पत्तीचें व प्रलयाचें निमित्त होतें त्याप्रमाणें अक्षरहि नाम-रूपकृत देहोपाधीमुळेंच जीवांच्या उत्पत्तीचें व प्रलयाचें निमित्त होतें. [ आपण जेव्हां आपल्या पुढें असलेल्या वस्तूकडे पाहतों तेव्हां त्याचा सर्व आकार आपल्याला दिसत नाहीं. तर पुढची बाजू मात्र दिसते. तथापि त्याचें प्रत्यक्ष ज्ञान आपल्याला झालें, असें आपण समजतों. त्याप्रमाणें प्रत्यक्-आत्म्याचें स्वरूप एक असून अपरोक्ष असल्यामुळें त्याच्या साक्षात्कारानें ब्रह्माचाहि साक्षात्कार होऊं शकतो. कारण प्रत्यगात्मा हा अद्वितीय ब्रह्माचाच कल्पित भाग आहे. अग्नीपासून निघणारे स्फुलिंग अग्नीला सोडून पृथक् पृथक् स्थानीं रहात असल्यामुळें त्यांना त्याचे अवयव इत्यादि म्हणतां येतें. पण उष्णत्व, प्रकाशत्व इत्यादि अग्नीचे धर्म त्यांच्यामध्येंहि असल्यामुळें वस्तुतः ते अग्निरूपच असतात. त्याचप्रमाणें जीवहि चिद्रूप

असल्यामुळें स्वतः ब्रह्मच आहे. पण ब्रह्म सर्वव्यापी असल्याकारणानें जीव त्याला सोडून पृथक् राहूं शकत नाहींत. म्हणूनच ते त्याचे खरे अवयव नसून कल्पित अंश आहेत.]१.

**श्रुतिः—दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरो ह्यजः ।**
**अप्राणो ह्यमनाः शुभ्रो ह्यक्षरात्परतः परः ॥ २ ॥**

**अर्थ**—स्वयंज्योति, अमूर्त, पूर्ण, आंतून बाहेरून ओतप्रोत, अज, प्राणरहित, मनोरहित, शुद्ध व सर्वांहून श्रेष्ठ असलेलें जें अक्षर त्याहून पर असा तो अक्षरात्मा आहे २

**भाष्यं—नामरूपबीजभूतादव्याकृताख्यात्स्वविकारापेक्षया परादक्षरात्परं यत्सर्वोपाधिभेदवर्जितमक्षरस्यैव स्वरूपमाकाशस्येव सर्वमूर्तिवर्जितं नेति नेतीत्यादिविशेषणं विवक्षन्नाह । दिव्यो द्योतनवान्स्वयंज्योतिष्ट्वात् । दिवि वा स्वात्मनि भवोऽलौकिको वा । हि यस्मादमूर्तः सर्वमूर्तिवर्जितः पुरुषः पूर्णः पुरिशयो वा । दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरः सह बाह्याभ्यन्तरेण वर्तत इति । अजो न जायते कुतश्चित्स्वतोऽन्यस्य जन्मनिमित्तस्य चाभावात् । यथा जलबुद्बुदादेर्वाय्वादि । यथा नभःसुषिरभेदानां घटादि । सर्वभावविकाराणां जनिमूलत्त्वात्तत्प्रतिषेधेन सर्वे प्रतिषिद्धा भवन्ति ॥**

**भाष्यार्थ**—( अक्षर ब्रह्माला जीवांच्या उत्पत्ति-प्रलयांचें निमित्तत्व औपाधिक आहे, असें त्याचें एकत्व सिद्ध करण्याकरितां वर सांगितलें आहे. पण तें सुद्धां खरें नव्हे. कारण ब्रह्मच जीव असल्यामुळें ब्रह्म व जीव यांच्यामध्यें वस्तुतः निमित्तनैमित्तिकभावहि नाहीं, असें आतां भाष्यकार सांगतात—)=नाम व रूप यांच्या बीजभूत, अव्याकृतसंज्ञक व आपल्या जगद्रूप विकाराच्या अपेक्षेनें पर—श्रेष्ठ अशा अक्षराहून पर, सर्व उपाधिकृत भेदांनीं रहित, सर्व मूर्तिरहित, आकाशाच्या स्वरूपाप्रमाणें अक्षराचेंच स्वरूप व ज्याला 'नेति नेति' असें विशेषण उपनिषदांत दिलें आहे त्याचें वर्णन करण्याच्या इच्छेनें हा मंत्र म्हणतो—तो '**दिव्यः**'—स्वयंज्योतिःस्वरूप असल्यामुळें द्योतनवान्, प्रकाशवान्, अथवा दिव्य म्हणजे स्वात्म्यामध्यें असणारा, स्वरूपांतच स्थित होणारा किंवा दिव्य म्हणजे अलौकिक आहे. '**हि**'—कारण तो '**अमूर्तः**'—सर्वमूर्तिशून्य, '**पुरुषः**'—पूर्ण किंवा देहनगरांत राहणारा आणि '**सबाह्याभ्यन्तरः**'—देहाच्या अपेक्षेनें जें बाह्य व आन्तर म्हणून प्रसिद्ध आहे त्याच्याशीं तादात्म्य पावून अथवा त्याच्या अधिष्ठानरूपानें राहणारा आहे. म्हणूनच सर्वात्मत्व असल्यामुळें व त्याच्याहून अतिरिक्त निमित्ताचा अभाव असल्यामुळें तो '**अजः**'—जो जन्म पावत नाहीं तो अज, स्वतः किंवा दुसऱ्या कोणत्याहि जन्माच्या निमित्ताचा अभाव असल्यामुळें अज. ज्याप्रमाणें पाण्यावर उठणाऱ्या बुडबुड्यांचें वायु-इत्यादि निमित्त, अथवा आकाशाचीं निरनिराळीं छिद्रें होण्याचें घटादि उपाधि हें निमित्त

त्याप्रमाणें अक्षराच्या जन्माचें कांहीं निमित्त नाहीं. अस्तित्व, वृद्धि, विपरिणाम, अपक्षय व नाश हे भावविकार जन्ममूलक असल्यामुळें म्हणजे जन्मानंतरच ते होणारे असल्यामुळें जन्माचा निषेध केल्यानें त्या सर्वांचाहि प्रतिषेध आपोआप होतो.

**भाष्यं--सबाह्याभ्यन्तरो ह्यजोऽतोऽजरोऽमृतोऽक्षरो ध्रुवोऽभय इत्यर्थः। यद्यपि देहाद्युपाधिभेददृष्टीनामविद्यावशाद्देहभेदेषु सप्राणः समनाः सेन्द्रियः सविषय इव प्रत्यवभासते तलमलादिमदिवाऽऽकाशं तथाऽपि तु स्वतः परमार्थदृष्टीनामप्राणोऽविद्यमानः क्रियाशक्तिभेदवांश्चलनात्मको वायुर्यस्मिन्नसावप्राणः। तथाऽमना अनेकज्ञानशक्तिभेदवत्संकल्पाद्यात्मकं मनोऽप्यविद्यमानं यस्मिन्सोऽयममना अप्राणो ह्यमनाश्चेति । प्राणादिवायुभेदाः कर्मेन्द्रियाणि तद्विषयाश्च तथा च बुद्धिमनसी बुद्धीन्द्रियाणि तद्विषयाश्च प्रतिषिद्धा वेदितव्याः। तथा श्रुत्यन्तरे--ध्यायतीव लेलायतीवेति ॥**

**भाष्यार्थ**---असो; याप्रमाणें तो दिव्य, अमूर्त, पुरुष, 'सबाह्याभ्यंतर' व 'अज' आहे. त्यामुळेंच अजर, अमृत, अक्षर, ध्रुव व अभय आहे असा याचा इत्यर्थ. [ जीव प्राणादिकांनीं युक्त असतात. यास्तव ब्रह्म जीवरूप आहे असें म्हटल्यास तेंहि प्राणादिकांनीं युक्त असतें, असें कोणी समजेल, म्हणून आचार्य म्हणतात--]=देहादि उपाधिभेदांकडेच दृष्टि ठेवणाऱ्या अज्ञांना अविद्यावशात् आकाश जसें तल व मल यांनीं युक्त आहेसें वाटतें त्याप्रमाणें निरनिराळ्या देहांमध्यें जरी तो जीवात्मा प्राणासह, मनासह, इंद्रियांसह व विषयांसह असल्यासारखा भासतो तरी परमार्थाकडे दृष्टि ठेवणाऱ्या विद्वानांना तो स्वतः '**अप्राणः**'--अप्राण आहे, असा अनुभव येतो. क्रियाशक्तिभेदवान् व चलनात्मक वायु ज्यामध्यें विद्यमान नसतो तो अप्राण होय. तसाच तो '**अमनाः**'--म्हणजे ऐकणें, पाहणें, स्मृति, संशय इत्यादि अनेक प्रकारच्या ज्ञानशक्तींनीं युक्त असलेलें संकल्पादिरूप मनहि ज्याच्यामध्यें अविद्यमान आहे तो 'अमनाः होय. 'अप्राणः' व 'अमनाः' या दोन विशेषणांनीं प्राण, अपान इत्यादि वायूचे भेद कर्मेंद्रियें व त्यांचे विषय आणि त्याचप्रमाणें बुद्धि, मन, ज्ञानेंद्रियें व त्यांचे विषय यांचा प्रतिषेध केला आहे; ब्रह्माचे ठिकाणीं यांतील कांहींएक नाहीं, असें सांगितलें आहे, असें समजावें. दुसऱ्या श्रुतीमध्येंहि 'ध्यायतीव, लेलायतीव'--म्हणजे जणुंकाय ध्यान करीत असल्यासारखें, क्रिया करीत असल्यासारखें,--सु उ.पृ. ६७०--असें म्हटलें आहे.

**भाष्यं---यस्माच्चैवं प्रतिषिद्धोपाधिद्वयस्तस्माच्छुभ्रः शुद्धः। अतोऽक्षरान्नामरूपबीजोपाधिलक्षितस्वरूपात्सर्वकार्यकारणबीजत्वेनोपलक्ष्यमाणत्वात्परं तदुपाधिलक्षणमव्याकृताख्यमक्षरं सर्वविकारेभ्यस्तस्मात्परतोऽक्षरात्परो निरुपाधिक**

**पुरुष इत्यर्थः । यस्मिंस्तदाकाशाख्यमक्षरं सव्यवहारविषयमोतं प्रोतं च । कथं पुनरप्राणादिमत्त्वं तस्येत्युच्यते । यदि हि प्राणादयः प्रागुत्पत्तेः पुरुष इव स्वेनाऽऽत्मना सन्ति तदा पुरुषस्य प्राणादिना विद्यमानेन प्राणादिमत्त्वं भवेन्न तु ते प्राणादयः प्रागुत्पत्तेः पुरुष इव स्वेनाऽऽत्मना सन्ति तदा । अतोऽप्राणादि-मान्परः पुरुषः । यथाऽनुत्पन्ने पुत्रेऽपुत्रो देवदत्तः ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—आणि ज्याअर्थी प्रत्यगात्म्याच्या ठिकाणीं या दोन्ही उपाधी नाहींत, असें म्हणून त्यांचा निषेध केलेला आहे त्याअर्थी तो '**शुभ्रः**'—शुद्ध आहे. नाम व रूप यांचें बीज ब्रह्म आहे. पण तें शुद्ध असल्यामुळें कशाचेंहि कारण होणें युक्त नाहीं. यास्तव त्याची उपाधि होऊन स्वरूप दाखविणाऱ्या अक्षराहून तो आत्मा पर आहे. ( येथें अक्षर म्हणजे मायातत्त्व असें जाणावें. त्या उपाधिरूप व त्या उपाधीनें विशिष्ट अशा पर अक्षराहूनहि अक्षर पुरुष पर आहे. मायातत्त्वरूप अक्षराला परत्व कसें? अशी आकांक्षा राहू नये, म्हणून आचार्य म्हणतात—)='**परतः अक्षरात् परः**'—अक्षर मायातत्त्व सर्व कार्यांच्या व कारणांच्या बीजरूपानें उपलक्षित होत असतें. त्यामुळें तें पर होय. तें उपाधिरूप अव्याकृतसंज्ञक अक्षर सर्व विकारांहून पर ( श्रेष्ठ ) आहे. त्या पर अक्षरा-हून निरुपाधिक पुरुष पर आहे, असा याचा इत्यर्थ. ( युक्तिदृष्ट्या त्याचा जरी बाध होत असला व त्यामुळें तें अनिर्वाच्य असलें तरी त्याच्या स्वरूपाचा उच्छेद होत नसल्यामुळें तें अक्षर होय. एवढ्यासाठींच श्रीमद्भगवद्गीतेंत 'सर्व भूतें हा क्षर पुरुष, कूटस्थ हा अक्षर पुरुष व परमात्मा या नांवाचा उत्तम पुरुष तर यांहून निराळा आहे असें म्हटलें आहे. गी.भा.१०४४-४६. )=त्या अक्षर पुरुषामध्यें तें आकाशाख्य अक्षर व्यवहारविषयांसह ओत-प्रोत आहे. पण त्या पुरुषाला अप्राणादिमत्त्व कसें? म्हणून विचाराल तर सांगतों प्राणादिक पुरुषाप्रमाणें जर उत्पत्तीच्या पूर्वी स्वरूपानें असते तर विद्यमान असलेल्या प्राणादिकांच्या योगानें पुरुषाला प्राणादिमत्त्व असतें. पण पुरुषाप्रमाणें ते प्राणादि उत्पत्तीच्या पूर्वी स्वरूपानें नसतात. यास्तव पर पुरुष अप्राणादिमान् आहे. म्हणजे पुत्र उत्पन्न झालेला नसल्यास देवदत्त जसा अपुत्र तसाच अक्षरात्मा 'अप्राण' होय. २.

**श्रुतिः—एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेन्द्रियाणि च ।**
**खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥ ३ ॥**

**अर्थ**—या पुरुषापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु, ज्योति, आप व सर्व चराचराला धारण करणारी पृथ्वी उत्पन्न होते. ३.

**भाष्यं—कथं ते न सन्ति प्राणादय इत्युच्यते।यस्मादेतस्मादेव पुरुषान्नामरूप-बीजोपाधिलक्षिताज्जायत उत्पद्यतेऽविद्याविषयविकारभूतो नामधेयोऽनृतात्मकः**

**प्राणः "वाचारम्भणं विकारो नामधेयमनृतम्" इति श्रुत्यन्तरात्। न हि तेनाविद्याविषयेणानृतेन प्राणेन सप्राणत्वं परस्य स्यादपुत्रस्य स्वप्नदृष्टेनेव पुत्रेण सपुत्रत्वम् ॥**

**भाष्यार्थ**—पण अक्षराच्या ठिकाणीं ते प्राणादिक कसे नसतात; तें हा मंत्र सांगत आहे. ( निरुपाधिक, शुद्ध, निर्विकल्प, सर्वव्यापि व ज्याच्या तत्त्वसाक्षात्कारानें जीवांना कैवल्य प्राप्त होतें तें चैतन्यच मायाप्रतिबिंबितरूपानें कारण होतें, असें आचार्य सांगतात—)=कारण '**एतस्मात्**' या नाम-रूपबीजोपाधीवरून लक्षित होणाऱ्या याच पुरुषापासून अविद्याविषय विकारभूत, केवल शब्दमात्र व म्हणूनच मिथ्यारूप '**प्राणः जायते**' —प्राण उत्पन्न होतो. याविषयीं 'विकार नुस्ता वाणीनें नामोच्चार करितां येण्यासारखा असतो. त्यामुळेंच तो अनृत—मिथ्या होय.'—मु.उ.४२५—अशा अर्थाची दुसरी श्रुति आहे. अर्थात् तसल्या अविद्याविषय अनृत प्राणानें पर पुरुषाला सप्राणत्व नाहीं. कारण पुत्ररहित पुरुषाला स्वप्नांत पाहिलेल्या पुत्राच्या योगानें सपुत्रत्व प्राप्त झालें आहे, असें आढळत नाहीं.

**भाष्यं**—**एवं मनः सर्वाणि चेन्द्रियाणि विषयाश्चैतस्मादेव जायन्ते। तस्मात्सिद्धमस्य निरुपचरितमप्राणादिमत्त्वमित्यर्थः। यथा च प्रागुत्पत्तेः परमार्थतोऽसन्तस्तथा प्रलीनाश्चेति द्रष्टव्याः। यथा करणानि मनश्चेन्द्रियाणि तथा शरीरविषयकारणानि भूतानि खमाकाशं वायुरन्तर्बाह्य आवहादिभेदः ॥**

**भाष्यार्थ**—'**मनः सर्वेन्द्रियाणि च**'—प्राणाप्रमाणेंच मन, सर्व इंद्रियें, व विषय या पुरुषापासूनच होतात आणि वस्तुस्थिति अशी असल्यामुळें पुरुषाचें मुख्य अप्राणादिमत्त्व सिद्ध होतें, असा याचा इत्यर्थ; आणि ज्याप्रमाणें उत्पत्तीच्या पूर्वीं प्राणादि परमार्थतः असत् असतात तसेच ते लीन झाल्यावरहि असत् होतात, असें समजावें. ज्याप्रमाणें करणें म्हणजे मन व इंद्रियें तशींच शरीर व विषय यांचीं कारणें—सर्व भूतें '**खं**' —म्हणजे आकाश, '**वायुः**'—आंतील व बाहेरील वायु, ज्याचे आवह, प्रवह इत्यादि अनेक भेद आहेत; ( समोरून येणाऱ्या वायूला आवह, पुढें जाणाराला प्रवह इत्यादि म्हणतात.]

**भाष्यं**—**ज्योतिरग्निः। आप उदकम्। पृथिवी धरित्री विश्वस्य सर्वस्य धारिणी एतानि च शब्दस्पर्शरूपरसगन्धोत्तरोत्तरगुणानि पूर्वपूर्वगुणसहितान्येतस्मादेव जायन्ते। संक्षेपतः परविद्याविषयमक्षरं निर्विशेषं पुरुषं सत्यं दिव्यो ह्यमूर्त इत्यादिना मन्त्रेणोक्त्वा पुनस्तदेव सविशेषं विस्तरेण वक्तव्यमिति प्रववृते संक्षेपविस्तरोक्तो हि पदार्थः सुखाधिगम्यो भवति सूत्रभाष्योक्तिवदिति ॥**

**भाष्यार्थ**—'**ज्योतिः०**'—अग्नि, जल व सर्वांना धारण करणारी पृथिवी हीं पांच भूतें या अक्षर पुरुषापासूनच होतात. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच त्या भूतांतील उत्तरोत्तर भूतांचे गुण असून पुढचीं पुढचीं भूतें मागच्या सर्व भूतांच्या गुणांनीं

युक्त असतात. (शब्द हा आकाशाचा गुण, स्पर्श हा वायूचा, रूप अग्नीचा, रस जलाचा व गंध हा पृथ्वीचा गुण आहे. ज्याप्रमाणें शुभ्र तंतू या अवस्थेस प्राप्त झालेल्या अन्वयी कारणापासून उत्पन्न होणारें वस्त्र शुभ्रगुणयुक्त असतें त्याप्रमाणें आकाशावस्थेस प्राप्त झालेल्या ब्रह्मापासून होणारा वायु आकाशाच्या शब्दगुणानें युक्त असतो. त्याचप्रमाणें वायुभावास प्राप्त झालेल्या ब्रह्मापासून वायूच्या स्पर्शगुणानें युक्त, असा अग्नि होतो. **शंका**—अहोपण, प्रथम सूक्ष्म भूतें उत्पन्न होतात. त्यानंतर 'तासां त्रिवृतं त्रिवृतं एकैकामकरोत्'–सु.उ.४२४–अशी पंचीकरणाची उपलक्षक त्रिवृत्करणश्रुति असल्यामुळें तिच्या अनुरोधानें प्रत्येक स्थूल भूत पंचभूतात्मक आहे, असें समजतें. त्यामुळेंच दुसऱ्या ग्रंथांतहि प्रत्येक भूतामध्यें पांच गुण आहेत, असें वर्णन केलेलें आढळतें. पण येथें पंचीकरणाचा अनादर करून प्रथम सर्गांतच आकाशाचें एकगुणत्व, वायूचें द्विगुणत्व, अग्नीचें त्रिगुणत्व इत्यादि कसें सांगत आहां? **समाधान**—खरें आहे. पण भूतांच्या सृष्टीचें–उत्पत्तीचें वर्णन करण्यांत उपनिषदांचें तात्पर्य नाहीं, हें प्रकट करण्याकरितां दुसऱ्या प्रक्रियेचा अवलंब करण्यांत कांहीं दोष नाहीं. कारण सृष्टीची उत्पत्ति कशी झाली तें न कळल्यामुळें कांहीं हानि होणार आहे, त्यामुळें एखादें फल प्रतिबद्ध होऊन राहिलें आहे, असें श्रुतीनें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. त्याकरितांच वैशेषिकपक्षाप्रमाणें येथें गुणगुणिभावहि विवक्षित नाहीं. तर केवल शिर हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा हूविषयींहि 'राहूचें शिर' हा जसा केवल व्यपदेश होतो त्याप्रमाणें आकाश हें भूत व शब्द हा त्याचा गुण, असा नुस्ता व्यपदेश–शब्दव्यवहार केला जातो. अगदीं शेवटच्या कार्यापर्यंत ब्रह्मच निरनिराळ्या आकारानें विवर्त पावतें, हा सिद्धान्त मात्र येथें विस्तारानें वर्णिलेला आहे. कारण ब्रह्माहून अतिरिक्त पदार्थाचा यत्किंचितृहि संभव नसल्यामुळें त्या एका नित्य तत्त्वाचें ज्ञान झालें असतां हें सर्व विशेषतः ज्ञात होतें, हें सर्व उपनिषदांना दाखवावयाचें आहे.)=परविद्याविषय, अक्षर, निर्विशेष व सत्य पुरुषच 'दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः'–पृ.३९–इत्यादि मंत्रानें संक्षेपतः सांगून पुनः तें तत्त्वच विशेषांसह सविस्तर सांगावें, म्हणून ही श्रुति प्रवृत्त होते. कारण सूत्र व त्यावरील भाष्य यांप्रमाणें संक्षेप व विस्तार यांच्या योगानें सांगितलेला पदार्थ–सिद्धान्त अनायासानें ज्ञात होण्यास योग्य होतो. ३.

**श्रुतिः—अग्निर्मूर्धा चक्षुषी चन्द्रसूर्यौ दिशः श्रोत्रे वाग्विवृताश्च वेदाः ।**
**वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥४॥**

**अर्थ**—अग्नि म्हणजे द्युलोक, हा ज्याचा मूर्धा–मस्तक आहे, चंद्र व सूर्य नेत्र आहेत. दिशा श्रोत्रेंद्रिय आहे. प्रसिद्ध वेद हीच वाक् आहे, वायु प्राण आहे, सर्व

जगत् हृदय आहे, आ... ज्याच्या पायांपासून पृथिवी झाली आहे तो हा देव स
भूतांचा अन्तरात्मा आहे ४.

**भाष्यं—योऽपि प्रथमजात्प्राणाद्धिरण्यगर्भाज्जायतेऽण्डस्यान्तर्विराट् स तत्त्वान्तरितत्वेन लक्ष्यमाणोऽप्येतस्मादेव पुरुषाज्जायत एतन्मयश्चेत्येतदर्थमाह तं च विशिनष्टि। अग्निर्द्युलोकः " असौ वाव लोको गौतमाग्निः " इति श्रुतेः मूर्धा यस्योत्तमाङ्गं शिरः। चक्षुषी चन्द्रश्च सूर्यश्चेति चन्द्रसूर्यौ यस्येति सर्वत्रानुषङ्गः कर्तव्यः। अस्येत्यस्यपदस्य वक्ष्यमाणस्य यस्येति विपरिणामं कृत्वा।**

**भाष्यार्थ**—जो प्रथम उत्पन्न झालेल्या प्राणापासून म्हणजे हिरण्यगर्भापासू ब्रह्मांडामध्यें विराट् उत्पन्न होतो तो निराळें तत्त्व आहे, अशा प्रकारें जरी लक्षित हो असला तरी तो याच पुरुषापासून होतो व या पुरुषमयच आहे, असा अर्थ हा मं सांगतो व त्या विराटाला विशेषणें देतो, ' बा गौतमा, हा वर दिसणारा द्युलोकच आग्नि आहे,'—सु. उ. पृ. ४०३—अशा अर्थाची श्रुति असल्यामुळें ' अग्नि ' म्हणजे द्युलोक तो ज्याचा ' मूर्धा ' म्हणजे उत्तमांग—शिर आहे,—' **चक्षुषी चन्द्रसूर्यौ** '—चंद्र व सूर्य हे ज्याचे नेत्र आहेत, या मंत्रांत ' अस्य ' म्ह० याचे असें पुढें पद आहे. त्याच ' यस्य ' म्ह० ज्याचें असा परिणाम करून सर्वत्र अनुषंग—संबंध करावा.

**भाष्यं—दिशः श्रोत्रे यस्य। वाग्विवृता उद्घाटिताः प्रसिद्धा वेदा यस्य वायुः प्राणो यस्य। हृदयमन्तःकरणं विश्वं समस्तं जगदस्य यस्येत्येतत्। सर्वं ह्यन्तःकरणविकारमेव जगन्मनस्येव सुषुप्ते प्रलयदर्शनात्। जागरितेऽपि तत एवाग्निविस्फुलिङ्गवद्विप्रतिष्ठानात्। यस्य च पद्भ्यां जाता पृथिवी। एष देवो विष्णुरनन्तः प्रथमशरीरी त्रैलोक्यदेहोपाधिः सर्वेषां भूतानामन्तरात्मा ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—' **दिशः श्रोत्रे** '—दिशा हेच ज्याचे कान आहेत, '**वाक् विवृताः वेदाः**' —ज्याची वाक् हेच उद्घाटित—प्रसिद्ध वेद आहेत, ' **वायुः प्राणः** '—वायु हाच ज्याचा प्राण आहे, ' **विश्वं हृदयं** '—सर्व विश्व हेंच ज्याचें अंतःकरण आहे, कारण सर्व जगत अंतःकरणाचाच विकार आहे. कारण सुषुप्तांत मनामध्यें त्याचा प्रलय होत असल्याचा अनुभव येतो आणि जागरित अवस्थेंत त्या मनापासूनच अग्नीपासून उडणाऱ्या किटाळां-प्रमाणें तें उत्पन्न होत असतें. ' **पद्भ्यां पृथिवी एषः सर्वभूतान्तरात्मा** '—ज्याच्या दोन्ही पायांपासून पृथिवी झाली तो हा विष्णु, अनन्त, पहिला शरीरी व त्रैलोक्यदेह हीच ज्याची उपाधि आहे असा तोच हा देव सर्व भूतांचा—स्थूल पंच महाभूतांचा—अंतरात्मा आहे. ( कारण स्थूल पंच भूतें हेंच विराटाचें शरीर आहे. ) ४.

**श्रुतिः—तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः सोमात्पर्जन्य**
**ओषधयः पृथिव्याम्। पुमान्रेतः सिञ्चति**
**योषितायां बह्वीः प्रजाः पुरुषात्संप्रसूताः ॥ ५ ॥**

**अर्थ**—त्याच्यापासून सूर्य ह्या ज्याच्या समिधा आहेत असा अग्नि झाला; सोमापासून पर्जन्य व पर्जन्यापासून पृथ्वींत ओषधी झाल्या. पुरुष त्या ओषधींपासून झालेलें रेत स्त्रीमध्यें सिंचितो. अशा रीतीनें पुष्कळ प्रजा परमात्म्यापासून उत्पन्न झाल्या आहेत. ५.

**भाष्यं—स हि सर्वभूतेषु द्रष्टा श्रोता मन्ता विज्ञाता सर्वकारणात्मा पञ्चाग्निद्वारेण च याः संसरन्ति प्रजास्ता अपि तस्मादेव पुरुषात्प्रजायन्त इत्युच्यते ॥**

**भाष्यार्थ**—तोच पुरुष सर्व भूतांमध्यें द्रष्टा, श्रोता, मंता, विज्ञाता व सर्वकारणात्मा आहे. द्युलोक, पर्जन्य, पृथ्वी, पुरुष व स्त्री या पांच पदार्थांमध्यें अग्निदृष्टि ठेवण्याविषयीं दुसऱ्या श्रुतींत सांगितलेलें असल्यामुळें त्या पंचाग्नींच्या द्वारा ज्या प्रजा संसार करितात त्याहि त्याच पुरुषापासून उत्पन्न होतात असें आतां या मंत्रांत सांगितलें जात आहे.

**भाष्यं—तस्मात्परस्मात्पुरुषात्प्रजावस्थानविशेषरूपोऽग्निः। स विशिष्यते। समिधो यस्य सूर्यः समिध इव समिधः। सूर्येण हि द्युलोकः समिध्यते। ततो हि द्युलोकान्निष्पन्नात्सोमात्पर्जन्यो द्वितीयोऽग्निः संभवति। तस्माच्च पर्जन्यादोषधयः पृथिव्यां संभवन्ति। ओषधिभ्यः पुरुषाग्नौ हुताभ्य उपादानभूताभ्यः पुमानग्नौ रेतः सिञ्चति योषितायां योषिति योषाग्नौ स्त्रियामिति। एवं क्रमेण बह्वीर्बह्व्यः प्रजा ब्राह्मणाद्याः पुरुषात्परस्मात्संप्रसूताः समुत्पन्नाः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—'**तस्मात्**'—त्या पुरुषापासून '**अग्निः**'—प्रजांचें एक प्रकारचें अवस्थानच, अशा प्रकारचा अग्नि उत्पन्न होतो. आतां त्या अग्नीलाच विशेषणें दिलीं जातात. '**यस्य सूर्यः समिधः**'—ज्या अग्नीच्या सूर्य या समिधा आहेत. जणूंकाय तो ( सूर्य ) त्याच्या समिधांसारखा आहे; कारण द्युलोक या नांवाचा पंचाग्निविद्येंतील पहिला अग्नि सूर्याकडून प्रकाशमान केला जातो. '**सोमात् पर्जन्यः**'—त्या द्युलोकापासून निष्पन्न झालेल्या सोमापासून पर्जन्य हा दुसरा अग्नि संभवतो. '**ओषधयः पृथिव्यां**'—त्या पर्जन्यापासून पृथ्वीमध्यें ओषधी संभवतात. '**पुमान् रेतः०**'—पुरुषरूप अग्नीमध्यें ज्यांचें हवन केलें आहे अशा उपादान कारणभूत ओषधींपासून रेत होतें. पुरुषसंज्ञक अग्नि त्या रेताचा स्त्रीरूपी अग्नींत सेक करितो. '**पुरुषात् बह्वीः-प्रजाः संप्रसूताः**'—ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि बहुत प्रजा त्या परम पुरुषापासून—परमात्म्यापासून उत्पन्न झालेली आहे. ५.

**श्रुतिः—तस्मादृचः साम यजूंषि दीक्षा यज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च।**
**संवत्सरश्च यजमानश्च लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः ॥ ६ ॥**

**अर्थ**—त्याच्यापासून ऋचा, साम, यजुषें, दीक्षा, सर्व अग्निहोत्रादि यज्ञ, यूपसहित ऋतु, दक्षिणा, काल, कर्ता व ज्यांत चंद्र लोकांना पवित्र करितो व सूर्य तप्त करितो ते लोक झाले. ६.

**भाष्यं**–किं च कर्मसाधनानि फलानि च तस्मादेवेत्याह। कथं तस्मात्पुरुषादृचो नियताक्षरपादावसाना गायत्र्यादिच्छन्दोविशिष्टा मन्त्राः। साम पाञ्चभक्तिकं च साप्तभक्तिकं च स्तोभादिगीतविशिष्टम्। यजूंष्यनियताक्षरपादावसानानि वाक्यरूपाण्येवं त्रिविधा मन्त्राः। दीक्षा मौञ्ज्यादिलक्षणा कर्तृनियमविशेषा। यज्ञाश्च सर्वेऽग्निहोत्रादयः। क्रतवः सयूपाः। दक्षिणाश्चैकगवाद्यपरिमितसर्वस्वान्ताः। संवत्सरश्च कालः कर्माङ्गः। यजमानश्च कर्ता। लोकास्तस्य कर्मफलभूतास्ते विशेष्यन्ते सोमो यत्र येषु लोकेषु पवते पुनाति लोकान्यत्र येषु सूर्यस्तपति च ते च दक्षिणायनोत्तरायणमार्गद्वयगम्या विद्वदविद्वत्कर्तृफलभूताः ॥ ६ ॥

**भाष्यार्थ**—कर्माचीं साधनें व फळेंहि त्याच्यापासूनच झालीं, असें आतां हा मंत्र सांगतो–कशीं झालीं तीं पहा–‘त्या पुरुषापासून ऋचा झाल्या.’ ज्या मंत्रांचे पाद-चतुर्थांश नियत अक्षरांनीं संपतात असे गायत्री, त्रिष्टुभ् इत्यादि छन्दोविशिष्ट मंत्र ह्याच ऋचा होत. त्यांच्यापासूनच पांचभक्तिक व साप्तभक्तिक स्तोभादि गीतविशिष्ट ‘साम’ झालें (हिंकार–प्रस्ताव–उद्गीथ–प्रतिहार–निधन या नावांचे ज्याचे पांच अवयव असतात तें पांचभक्तिक व त्यांतच आणखीं उपद्रव व निधन हे दोन अवयव मिळविले असतां साप्तभक्तिक साम होतें. स्तोभ म्हणजे ‘हूं फट्’ इत्यादि अर्थशून्य वर्ण.) याचप्रमाणें ‘यजुर्मंत्र’ म्हणजे ज्यांच्या पादांचें अवसान–समाप्ति–अनियत अक्षरांनीं होतें ते वाक्यरूप मंत्र त्याच्यापासूनच होतात. असो; तात्पर्य ऋचा, साम व यजुर्मंत्र असे तीन प्रकारचे मंत्र, मौंजी इत्यादि लक्षण कर्त्याच्या विशेष नियमरूप ‘दीक्षा’, अग्निहोत्रादि सर्व ‘यज्ञ’, यूप युक्त–पशुबंधनस्तंभयुक्त ‘क्रतु’, एका गायीपासून अपरिमित सर्वस्वदानापर्यंत सर्व ‘दक्षिणा,’ कर्मांचा अंगभूत ‘संवत्सर’ काल, कर्ता ‘यजमान,’ व त्याच्या कर्मांचे फलरूप ‘लोक’ त्या लोकांनाच आतां विशेषणें दिलीं जातात.–‘**यत्र सोमः पवते**’ –ज्या लोकांमध्यें सोम लोकांस पावन करतो व ‘**यत्र सूर्यः**’–ज्या लोकांत सूर्य ताप देतो ते लोक दक्षिणायन व उत्तरायण या दोन मार्गांनीं जातां येण्यासारखे व विद्वान आणि अविद्वान् कर्त्यांच्या कर्मफलभूत आहेत. (तात्पर्य ऋचा, साम इत्यादिकांपासून लोकांपर्यंत या मंत्रांत सांगितलेले सर्व पदार्थ त्या परमात्म्यापासून होतात.) ६

**श्रुतिः—तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः साध्या मनुष्याः पशवो वयांसि**
**प्राणापानौ व्रीहियवौ तपश्च श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च ॥७॥**

**अर्थ**—आणि त्या पुरुषापासून कर्मांगभूत देव अनेकधा उत्पन्न झाले आहेत. नुष्य, पशू, पक्षी, प्राणापान, व्रीहि-यवादि हविर्द्रव्यें, तप, श्रद्धा, सत्य, ब्रह्मचर्य -धि हीं सर्व उत्पन्न झालीं. ७

**भाष्यं—तस्माच्च पुरुषात्कर्माङ्गभूता देवा बहुधा वस्वादिगणभेदेन संप्रसूताः म्यक्प्रसूताः। साध्या देवविशेषाः। मनुष्याः कर्माधिकृताः। पशवो ग्राम्यारण्याः। यांसि पक्षिणः जीवनं च मनुष्यादीनाम्। प्राणापानौ व्रीहियवौ हविरर्थौ। तपश्च र्माङ्गं पुरुषसंस्कारलक्षणं स्वतन्त्रं च फलसाधनम्।श्रद्धा यत्पूर्वकः सर्वपुरुषार्थ-ाधनप्रयोगश्चित्तप्रसाद आस्तिक्यबुद्धिस्तथा सत्यमनृतवर्जनं यथाभूतार्थवचनं ापीडाकरम्। ब्रह्मचर्यं मैथुनासमाचारः। विधिश्चेतिकर्तव्यता ॥ ७॥**

**भाष्यार्थ**—'त्या पुरुषापासून' कर्मांगभूत 'देव बहुतप्रकारें'—वसु, रुद्र इत्यादि ाभेदानें 'चांगल्या रीतीनें उत्पन्न झाले आहेत.' 'साध्य' या नांवाचे विशेष देव, ींचा ज्यांना अधिकार आहे, असे 'मनुष्य,' ग्राम्य व आरण्य 'पशु,' '**वयांसि**'—'पक्षी' मनुष्यादिकांचें 'जीवन,' 'प्राण व अपान,' '**व्रीहियवौ**'—हवीकरितां आवश्यक सलेले व्रीहि व यव, कर्मांच्या अंगभूत, पुरुषसंस्कारलक्षण व स्वतंत्रपणें फलाचें धन होणारें कृच्छ्र-चांद्रायणादि 'तप,' जिच्या अस्तित्वामुळेंच सर्व पुरुषार्थसाधनांचें नुष्ठान, चित्तप्रसाद व आस्तिक्यबुद्धि होते ती 'श्रद्धा,' तसेंच 'सत्य' म्हणजे अनृत-र्जन व कोणालाहि पीडा न करणारें यथार्थ वचन, 'ब्रह्मचर्य'—मैथुनाचें वर्जन व तेकर्तव्यतारूप 'विधि' त्याच्या पासून झाले. ७.

**श्रुतिः—सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्त होमाः। सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशया निहिताः सप्त सप्त ॥ ८॥**

**अर्थ**—मस्तकांतील सात प्राण त्याच पुरुषापासून उत्पन्न होतात. त्यांच्या सात ाला म्ह० आपापला विषय व्यक्त करणाऱ्या शक्ती, सात विषयरूप समिधा, सात ्रयसाक्षात्काररूप होम, तसेंच ज्यांत प्राण संचार करितात असे हे सात इंद्रियद्वार-ा लोक; इत्यादि सर्व त्या पुरुषापासून झालें आहे. विधात्यानें असे हे शरीरांत किंवा द्रासमयीं हृदयांत शयन करणारे प्राण प्रत्येक प्राण्यांत सात सात स्थापिले आहेत ८.

**भाष्यं—किं च सप्त शीर्षण्याः प्राणास्तस्मादेव पुरुषात्प्रभवन्ति। तेषां च तार्चिषो दीप्तयः स्वविषयावद्योतनानि। तथा सप्त समिधः सप्त विषयाः। विष-र्हि समिध्यन्ते प्राणाः। सप्त होमास्तद्विषयविज्ञानानि "यदस्य विज्ञानं तज्जु-ति" इति श्रुत्यन्तरात्॥**

.ष्यार्थ—तसेच मस्तकसंबंधी 'सात प्राण' [म्हणजे दोन श्रोत्र, दोन चक्षु, दोन ( व एक रसन ] 'तस्मात् प्रभवन्ति'—त्या पुरुषापासूनच होतात. 'सप्तार्चिषः' —त्याच्या सात दीप्ति म्हणजे आपापल्या विषयांची प्रकाशनें. त्याचप्रमाणें सात विषय या सात 'समिधा' कारण विषयांच्या योगानेंच प्राण चांगल्या रीतीनें प्रदीप्त केले जातात. 'याचें जें विज्ञान तोच त्याचा होम होय'—सा. ना. पृ. ८३—अशी दुसरी श्रुति असल्यामुळें त्याचीं सात विषयविज्ञानें हेच सात 'होम' त्याच्यापासून होतात.

**भाष्यं—किं च सप्तेमे लोका इन्द्रियस्थानानि येषु चरन्ति संचरन्ति प्राणाः। प्राणा येषु चरन्तीति प्राणानां विशेषणमिदं प्राणापानादिनिवृत्त्यर्थम्। गुहायां शरीरे हृदये वा स्वापकाले शेरत इति गुहाशयाः। निहिताः स्थापिता धात्रा सप्त सप्त प्रतिप्राणिभेदम्। यानि चाऽऽत्मयाजिनां विदुषां कर्माणि कर्मफलानि चाविदुषां च कर्माणि तत्साधनानि कर्मफलानि च सर्वं चैतत्परस्मादेव पुरुषात्सर्वज्ञात्प्रसूतमिति प्रकरणार्थः॥ ८॥**

**भाष्यार्थ**—तसेंच '**येषु प्राणाः चरन्ति इमे सप्त लोकाः**'—ज्यांमध्यें हे प्राण संचार करितात तीं सात इंद्रियस्थानें हेच सात लोक. प्राण, अपान इत्यादिकांची निवृत्ति करण्याकरितां 'ज्यांत प्राण संचार करितात,' असें प्राणांना येथें विशेषण दिलें आहे. त्याचप्रमाणें ते सात प्राण 'गुहाशय' आहेत. निद्रासमयीं शरीररूप अथवा हृदयरूप गुहेमध्यें शयन करितात, म्हणून ते गुहाशय, याप्रमाणें प्रत्येक प्राण्यामध्यें 'सात सात' प्राण धात्यानें स्थापिले आहेत. हें सर्व व मी परमात्माच आहें, अशा भावनेनें परमेश्वराच्या आराधनबुद्धीनें जे यजन करितात त्या आत्मयाजी विद्वानांचीं कर्में व कर्मफलें, तशींच अविद्वानांचीं कर्में, त्यांचीं साधनें व कर्मफलें इत्यादि सर्व सर्वज्ञ परमपुरुषापासूनच उत्पन्न झालें, हा या प्रकरणाचा अर्थ आहे. ८.

**श्रुतिः—अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्स्यन्दन्ते सिन्धवः सर्वरूपाः।**
**अतश्च सर्वा ओषधयो रसश्च येनैष भूतैस्तिष्ठते ह्यन्तरात्मा॥९॥**

**अर्थ**—या पुरुषापासून सर्व समुद्र व पर्वत उत्पन्न होतात. यापासूनच बहुरूप नद्या स्रवतात—वाहतात. त्याच्यापासूनच व्रीहि-यवादि सर्व ओषधी व मधुरादि रस होतात. या रसाच्या योगानें पंच स्थूल भूतांनीं परिवेष्टित झालेला अन्तरात्मा—लिंगशरीर—राहतो. ९.

**भाष्यं—अतः पुरुषात्समुद्राः सर्वे क्षाराद्याः। गिरयश्च हिमवदादयोऽस्मादेव पुरुषात्सर्वे। स्यन्दन्ते स्रवन्ति गङ्गाद्याः सिन्धवो नद्यः सर्वरूपा बहुरूपा अस्मादेव पुरुषात्सर्वा ओषधयो व्रीहियवाद्याः। रसश्च मधुरादिः षड्विधो येन रसेन भूतैः पञ्चभिः स्थूलैः परिवेष्टितस्तिष्ठते तिष्ठति ह्यन्तरात्मा लिङ्गं सूक्ष्मं शरीरं। तद्ध्यन्तराले शरीरस्याऽऽत्मनश्चाऽऽत्मवद्वर्तत इत्यन्तरात्मा॥९॥**

**भाष्यार्थ**–'अतः समुद्राः'–या पुरुषापासून क्षारादि सर्व समुद्र झाले 'च सर्वे गिरयः' हिमालयादि सर्व पर्वतहि याच पुरुषापासून होतात. 'अस्मात् स्यन्दन्ते' गंगा, यमुना इत्यादि बहुरूप नद्याहि याच्या पासून उत्पन्न होऊन वाहूं लागतात. 'अतः सर्वाः०' याच पुरुषापासून सर्व व्रीहि-यवादि ओषधि व मधुरादि सहा प्रकारचा 'रस' होतो. 'येन एषः अन्तरात्मा भूतैः तिष्ठति '–त्या रसाच्या योगानें अंतरात्मा (म्हणजे लिंग–सूक्ष्म शरीर) पांच स्थूल भूतांनीं परिवेष्टित होऊन राहतो. लिंगशरीर आत्मा व शरीर यांच्यामध्यें आत्म्याप्रमाणें राहतें, म्हणून त्याला येथें अंतरात्मा, असें म्हटलें आहे ९.

**श्रुतिः**—**पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम् । एतद्यो
वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रन्थिं विकिरतीह सोम्य ॥१०॥**

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

अर्थ—पुरुषच हें सर्व, कर्म व तप आहे. ब्रह्माचें कार्य असें हें सर्व श्रेष्ठ अमृत आहे. हेंच सर्व भूतांच्या हृदयांत स्थित आहे, असें जो जाणतो तो, हे प्रिय शिष्या, येथें अविद्याग्रंथीला नाहींसें करितो. १०

**भाष्यं—एवं पुरुषात्सर्वमिदं संप्रसूतम् । अतो वाचारम्भणं विकारो नामधेयमनृतं पुरुष इत्येव सत्यम् । अतः पुरुष एवेदं विश्वं सर्वम् । न विश्वं नाम पुरुषादन्यत्किंचिदस्ति । अतो यदुक्तं तदेतदभिहितं ' कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ' । एतस्मिन्हि परस्मिन्नात्मनि सर्वकारणे पुरुषे विज्ञाते पुरुष एवेदं विश्वं नान्यदस्तीति विज्ञातं भवतीति ॥**

**भाष्यार्थ**—याप्रमाणें पुरुषापासून हें सर्व उत्पन्न झालें. यास्तव केवळ वाणीनेंच बोलतां येण्यासारखा व म्हणूनच शब्दमात्र असलेला विकार मिथ्या आहे. पुरुष मात्र सत्य आहे. एवढ्यासाठीं ' पुरुषः एव इदं विश्वं'–पुरुषच हें विश्व–सर्व आहे, विश्व म्हणून पुरुषाहून पृथक् कांहीं नाहीं. यास्तव 'हे भगवन्, कोणाचें ज्ञान झालें असतां हें सर्व विज्ञात होतें'–पृ.१०–असें जें वर विचारलें होतें त्याचें हें उत्तर सांगितलें आहे. याच सर्वकारणभूत परमात्म्या पुरुषाला साक्षात् जाणलें असतां पुरुषच हें सर्व विश्व आहे, त्याहून अन्य कांहीं नाहीं असें विज्ञात होतें.

**भाष्यं—किं पुनरिदं विश्वमित्युच्यते । कर्माग्निहोत्रादिलक्षणम् । तपो ज्ञानं तत्कृतं फलमन्यदेतावद्धीदं सर्वम् । तच्चैतद्ब्रह्मणः कार्यं तस्मात्सर्वं ब्रह्म परामृतं परममृतमहमेवेति यो वेद निहितं स्थितं गुहायां हृदि सर्वप्राणिनां स एवं विज्ञानादविद्याग्रन्थिं ग्रन्थिमिव दृढीभूतामविद्यावासनां विकिरति विक्षिपति नाशयतीह जीवन्नेव न मृतः सन्हे सोम्य प्रियदर्शन ॥ १० ॥**

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**भाष्यार्थ**—पण 'विश्व' असें हें कोणाला म्हटलें जातें? सांगतो—अग्निहोत्रादिलक्षण 'कर्म' 'तप'—ज्ञान, त्यामुळें प्राप्त होणारें फल आणि अशाच प्रकारचें दुसरेंहि हें सर्व विश्व होय. तें ब्रह्माचें कार्य आहे. तस्मात् सर्व ब्रह्म **'परामृतं'**—परम अमृत आहे व तें परम अमृत मीच आहें, **'एतत् यः वेद०'**—असें जो त्या सर्व प्राण्यांच्या हृदयरूप गुहेमध्यें स्थित असलेल्या ब्रह्माला जाणतो **'सः अविद्याग्रंथिं०'**—तो अशा विज्ञानामुळें अविद्याग्रंथीस म्हणजे ग्रंथीप्रमाणें दृढ झालेल्या अविद्यावासनेस या लोकीं जिवंत असतांनाच, मेल्यावर नव्हे, **'सोम्य'**—हे प्रियदर्शन शौनका, नष्ट करून सोडतो. ( हें सर्व परमात्म्यापासून होतें, यास्तव परमात्ममात्र असलेलें हें सर्व त्याच्या विज्ञानानें विज्ञात होतें, असें अविद्याक्षयरूप फल सांगून, येथें वरील प्रश्नाच्या उत्तराचा उपसंहार केला आहे. ) १०

इति मुंडकोपनिद्भाष्यार्थाच्या दुसऱ्या मुंडकाचें प्रथम खंड समाप्त.

---

**श्रुतिः—आविः संनिहितं गुहाचरं नाम महत्पदमत्रैतत्समर्पितम् । एजत्प्राणन्निमिषच्च यदेतज्जानथ सदसद्वरेण्यं परं विज्ञानाद्यद्वरिष्ठं प्रजानाम् ॥१॥**

**अर्थ**—ब्रह्म प्रकाशरूप व समीप स्थित आहे. तें गुहाचर या नांवाचें आहे. तें महत् पद आहे. यांत चलन करणारें, प्राणनादि करणारें, निमिषोन्मेष करणारें व तें न करणारें हें सर्व समर्पिलेलें आहे. तेंच पद सदसत्स्वरूप आहे असें जाणा. तें प्रार्थनीय आहे. तें प्रजांच्या सामान्य विज्ञानाहून अगदीं दूर आहे. तसेंच तें वरिष्ठ आहे १.

**भाष्यं—अरूपं सदक्षरं केन प्रकारेण विज्ञेयमित्युच्यते । आविः प्रकाशं संनिहितं वागाद्युपाधिभिर्ज्वलति भ्राजतीति श्रुत्यन्तराच्छब्दादीनुपलभमानवदवभासते । दर्शनश्रवणमननविज्ञानाद्युपाधिधर्मैराविर्भूतं सल्लक्ष्यते हृदि सर्वप्राणिनाम्॥**

**भाष्यार्थ**—( आतां एकदा केलेल्या उपदेशानेंच ज्याला 'मी अद्वितीय ब्रह्म आहें,' असें महावाक्याच्या अर्थाचें ज्ञान होत नाहीं, त्याला उपायाचें अनुष्ठान करणें उचित आहे, अशा अभिप्रायानें भाष्यकार '**अरूपं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—) =अरूप असलेलें अक्षर कोणत्या प्रकारानें जाणण्यास योग्य आहे तें सांगतो. ( महावाक्याच्या अर्थाचीच पुनः पुनः भावना करून त्या अर्थाला अनुकूल असलेल्या युक्तीचें पुनः पुनः अनुसंधान करणें, हाच अक्षराला जाणण्याचा उपाय आहे, असें आतां मंत्रव्याख्यानद्वारा सांगतात—)=**'आविः'**—प्रकाश व '**संनिहितं**'—समीप स्थित, 'वागादि उपाधींनीं तें दीप्त होतें, प्रकाशमान होतें,' अशी दुसरी श्रुति असल्यामुळें शब्दादिकांस जाणत असल्यासारखें तें भासतें. तें सर्व प्राण्यांच्या हृदयांत पाहणें, ऐकणें, मनन करणें, जाणणें इत्यादि उपाधिधर्मांनीं आविर्भूत झाल्यासारखें दिसतें. सर्व प्राण्यांच्या हृदयांत स्थित असलेलें व वागादि उपाधींनीं शब्दादिकांचें ग्रहण

रणारें ब्रह्मच जीवभावास प्राप्त झालें आहे, असा भास होतो. यास्तव तें स्वतः
ापरोक्ष आहे, असें सदा अनुसंधान करावें. ]

**भाष्यं—यदेतदाविर्ब्रह्म संनिहितं सम्यक्स्थितं हृदि तद्गुहाचरं नाम गुहा-
ां चरतीति दर्शनश्रवणादिप्रकारैर्गुहाचरमिति प्रख्यातम् । महत्सर्वमहत्त्वात् ।
दं पद्यते सर्वेणेति सर्वपदार्थास्पदत्वात् । कथं तन्महत्पदमित्युच्यते । यतोऽ-
ास्मिन्ब्रह्मण्येतत्सर्वं समर्पितं प्रवेशितं रथनाभाविवाराः । एजच्चलत्पक्ष्यादि ।
ाणत्प्राणितीति प्राणापानादिमन्मनुष्यपश्वादि । निमिषच्च यन्निमेषादिक्रि-
ावद्यच्चानिमिषच्चशब्दात्समस्तमेतदत्रैव ब्रह्मणि समर्पितम् ॥**

**भाष्यार्थ**—अशाप्रकारचें जें हें प्रकाशरूप संनिहित ब्रह्म तें हृदयांत चांगल्या-
कारें स्थित आहे. '**गुहाचरं नाम**'–तें गुहाचर या नांवाचें आहे. गुहेमध्यें
चार करतें म्हणून गुहाचर. पाहणें, ऐकणें, इत्यादि प्रकारांनीं गुहाचर म्हणून
प्रख्यात आहे. तें सर्वांहून महत्त्ववान् असल्यामुळें '**महत्**' व सर्व
दार्थांचें आस्पद–आधार असल्यामुळें '**पदं**'–पद आहे. कारण सर्व त्या आपल्या
ास्पदास प्राप्त होतात. [ हें सर्व कार्य मर्यादित व सास्पद–आधारयुक्त आहे. कारण
घटादिकांप्रमाणें कार्य आहे व परिच्छिन्न आहे. यास्तव जें सर्वास्पद तत्त्व तेंच
ायेचेंहि आस्पद–आधार आत्मभूत होय, या युक्तीचें अनुसंधान करावें, असें '**कथं
त्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें महत्पद कसें ? म्हणून विचाराल तर सांगतों
'**अत्र एतत् समर्पितं**'–रथाच्या चाकाच्या नाभीमध्यें जसे अर बसविलेले असतात
ाप्रमाणें या ब्रह्मामध्यें हें सर्व विश्व बसविलेलें आहे. आतां त्यांत काय कांय प्रविष्ट कर-
लें आहे, तें '**एजत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]='**एजत्**'–चलन करणारें,
क्षी इत्यादि; '**प्राणत्**'–प्राणापानादिकांनीं युक्त असलेलें, मनुष्य, पशु इत्यादि,
**निमिषत् च**'–निमिषोन्मेष–नेत्रांची उघड-झांप करणारें व निमिषादि क्रिया न कर-
ारें आणि दुसरेंहि सर्व जगत् या ब्रह्मामध्येंच समर्पिलेलें आहे.

**भाष्यं—एतद्यदास्पदं सर्वं जानथ हे शिष्या अवगच्छथ तदात्मभूतं भवतां
सदसत्स्वरूपम् । सदसतोर्मूर्तामूर्तयोः स्थूलसूक्ष्मयोस्तद्व्यतिरेकेणाभावात् ।
वरेण्यं वरणीयं तदेव हि सर्वस्य नित्यत्वात्प्रार्थनीयं । परं व्यतिरिक्तं विज्ञाना-
त्प्रजानामिति व्यवहितेन संबन्धो यल्लौकिकविज्ञानागोचरमित्यर्थः । यद्वरिष्ठं
वरतमं सर्वपदार्थेषु वरेषु तद्ध्येकं ब्रह्मातिशयेन वरं सर्वदोषरहितत्वात् ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—हे शिष्यांनो, '**यत् एतत् जानथ**'–ह्या सर्वांचें जें आस्पद आहे
तेंच तुमचें आत्मभूत सदसत्स्वरूप आहे, असें जाणा. कारण '**सत्-असत्**'–मूर्ता-

मूर्त–व्यक्ताव्यक्त–स्थूल-सूक्ष्म पदार्थांचा त्या तत्त्वाहून पृथक्पणानें अभाव आहे. म्हण स्थूल-सूक्ष्म भूतें त्या तत्त्वाहून पृथक् नाहींत. तसेंच तें नित्यत्वामुळें 'वरेण्यं'–सर्वांना व प्यास–प्रार्थना करण्यास योग्य आहे. (तें आपल्याला प्राप्त व्हावें, असें सर्वांना वाटण्य सारखें तें आहे. )=' प्रजानां विज्ञानात् परं '–तें सामान्य प्रजाजनांच्या विज्ञान हून अगदीं दूर आहे. तें लौकिकविज्ञानाचा विषय होत नाहीं, असा याचा इत्यर्थ तसेंच तें ' वरिष्ठं '–अतिशय श्रेष्ठ. सर्व उत्तम पदार्थांमध्यें तेंच एक ब्रह्म सर्वदो रहित असल्यामुळें अतिशय श्रेष्ठ आहे. १.

श्रुतिः—यदर्चिमद्यदणुभ्योऽणु च यस्मिँल्लोका निहिता लोकिनश्च । तदेतदक्ष ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्मनः । तदेतत्सत्यं तदमृतं तद्वेद्धव्यं सोम्य विद्धि ॥

अर्थ–जें दीप्तियुक्त आहे, जें अणु पदार्थांहून अणु आहे व ज्याच्यामध्यें भूरादि लो व त्या लोकांत राहणारे मनुष्यादि लोक स्थित आहेत तें हें अक्षर ब्रह्म आहे. तोच प्रा आहे, तेंच वाणी व मन आहे. तेंच हें सत्य, तेंच अमृत आहे. हे शिष्या, त्याच वेध करावा. त्याला तूं वेध कर २

भाष्यं—किं च यदर्चिमद्दीप्तिमद्दीप्त्याऽऽदित्यादि दीप्यत इति दीप्तिमद्ब्रह्म किं च यदणुभ्यः श्यामाकादिभ्योऽप्यणु च सूक्ष्मम् । चशब्दात्स्थूलेभ्योऽप्य तिशयेन स्थूलं पृथिव्यादिभ्यः । यस्मिँल्लोका भूरादयो निहिताः स्थिताः । च लोकिनो लोकनिवासिनो मनुष्यादयश्चैतन्याश्रया हि सर्वे प्रसिद्धाः ॥

भाष्यार्थ—[ घट, पट–वस्त्र इत्यादि पदार्थांप्रमाणेंच आदित्यादिक जड असूनं त्यांच्यामध्यें दीप्ति हा जो विलक्षण गुण दिसतो त्याचें कारण कांहीं निराळेंच असलें पाहि व तें ब्रह्मच होय, अशी संभावना करावी, असें आतां भाष्यकार या दुसऱ्या मंत्राच्य व्याख्यानाच्या द्वारा सांगतात–]'यदर्चिमत्'–शिवाय तें ब्रह्म 'अर्चिर्युक्त' आहे. 'अर्चि: ह्मणजे दीप्ति. त्याच्या दीप्तीनें आदित्यादिक दीप्तियुक्त होतात. म्हणून तें दीप्तिमत् ब्रह [ तथापि दीप्तिमान् असलेलें तें सूर्यादिकांप्रमाणेंच इंद्रियांनीं ग्राह्य होईल अशी आश करूं नये. कारण–]=' यदणुभ्यः अणु च '–जें सांवे, नाचणे, इत्यादि अणुप्रमा पदार्थांहूनहि अणु–सूक्ष्म आहे; आणि मूळ श्रुतींत ' अणुभ्योऽणु च ' असा ' च शब्द असल्यामुळें तें पृथिव्यादि स्थूल पदार्थांहूनहि अतिशय स्थूल आहे. ( पण जरी स्थूल असलें तरी त्याचा दुसरा कांहीं आधार असेल अशी शंका घेऊं नके कारण–)='यस्मिन् लोकाः निहिताः'–ज्याच्यामध्यें भूः, भुवर् इत्यादि सर्व लोक स्थि आहेत. ' च लोकिनः'–त्याचप्रमाणें जे लोकी म्हणजे लोकनिवासी मनुष्यादिक ते स प्रसिद्ध लोकनिवासी चैतन्याच्या आश्रयानेंच राहतात. [प्राणादि जड तत्त्वांची प्रतिक्षण

नुअवास येणारी प्रवृत्ति अधिष्ठात्याच्या निमित्तानेंच होते. कारण रथादि इतर अचे
ार्थांची प्रवृत्ति अश्वादि चेतन अधिष्ठात्यावांचून होत असल्याचें दिसत नाहीं; आणि
येक शरीरांतील चैतन्यांत भेद आहे, असें समजण्यास कांहीं प्रमाण नाहीं. वास्तव 'मी
ह सर्वव्यापी चैतन्य आहें,' असा विचार करावा, असें आतां भाष्यकार 'तदेतत्०'
यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—तदेतत्सर्वाश्रयमक्षरं ब्रह्म स प्राणस्तदु वाङ्मनो वाक्च मनश्च**
**श्रोणि च करणानि तदन्तश्चैतन्यं चैतन्याश्रयो हि प्राणेन्द्रियादिसर्वसंघातः**
**प्राणस्य प्राणम्" इति श्रुत्यन्तरात्। यत्प्राणादीनामन्तश्चैतन्यमक्षरं तदेत-**
**त्यमवितथमतोऽमृतमाविनाशि तद्वेद्धव्यं मनसा ताडयितव्यम्। तस्मिन्मनः-**
**माधानं कर्तव्यमित्यर्थः। यस्मादेवं हे सोम्य विद्ध्यक्षरे चेतः समाधत्स्व ॥२**

**भाष्यार्थ**—तें हें सर्वाश्रयभूत अक्षर ब्रह्म आहे. 'तेंच प्राण, तेंच वाणी व मन-आणि
इंद्रियें आहे, त्या सर्वांमध्यें चैतन्य आहे 'प्राणस्य प्राणं'-सु.उ.पृ.६९५-म्हणजे जें
गाचें प्राण, मनाचें मन, इत्यादि दुसरी श्रुति असल्यामुळें प्राण, इंद्रियें इत्यादिकांचा सर्व
ात चैतन्याच्या आश्रयानें राहणारा आहे. '**तत् एतत्**'- हें जें प्राणादिकांच्या
श्रयानें त्यांच्या आंत राहणारें चैतन्य अक्षर तेंच हें '**सत्यं**'-अवितथ-अमिथ्या,
'**अमृतं**'-अविनाशी आहे. '**तत् वेद्धव्यं**'-त्याला मनानें वेध करावा, ताडन
ावें. त्याच्यामध्यें मनाचें समाधान करावें, असा याचा इत्यर्थ; ज्याअर्थी असें आहे
अर्थी '**सोम्य विद्धि**'-हे शिष्या, अक्षरामध्यें चित्त स्थिर कर. चित्तसमाधान
. ( ब्रह्म प्राणादिकांचें अधिष्ठान असल्यामुळें प्राणादिकांवरून उपलक्षित होणारा
त्मा पहावा; त्याचें अनुसंधान करावें ) २

**श्रुतिः—धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासानिशितं संधयीत।**
**आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं तदेवाक्षरं सोम्य विद्धि ॥३॥**

**अर्थ**—उपनिषदांतील महास्त्ररूप धनुष्य घेऊन उपासनेनें तीक्ष्ण केलेला शर त्याला
डावा. नंतर त्याची प्रत्यंचा-दोरी ओढून हे प्रियदर्शन शिष्या, ब्रह्मविषयक भावनायुक्त
त्तानें त्याच अक्षररूप लक्ष्याला वेध कर ३.

**भाष्यं—कथं वेद्धव्यमित्युच्यते। धनुरिष्वासनं गृहीत्वाऽऽदायौपनिषदमुप-**
**षत्सु भवं प्रसिद्धं महास्त्रं महच्च तदस्त्रं च महास्त्रं धनुस्तस्मिन्शरम्। किंवि-**
**ष्टमित्याह। उपासानिशितं संततामिध्यानेन तनूकृतं संस्कृतमित्येतत्। संध-**
**त संधानं कुर्यात्। संधाय चाऽऽयम्याऽऽकृष्य सेन्द्रियमन्तःकरणं स्वविषया-**
**निवर्त्य लक्ष्य एवाऽऽवर्जितं कृत्वेत्यर्थः। न हि हस्तेनेव धनुष आयमनमिह**

**संभवति । तद्भावगतेन तस्मिन्ब्रह्मण्यक्षरे लक्ष्ये भावना भावस्तद्गतेन चेतसा लक्ष्यं तदेव यथोक्तलक्षणमक्षरं सोम्य विद्धि ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—[ विचार करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषानें प्रणवाचा आश्रय करून ब्रह्म व आत्मा यांच्या एकत्वामध्यें चित्तसमाधान करावें. अशा चित्तसमाधानाचें क्रममुक्ति हें फल आहे, असें सांगण्यासाठीं भाष्यकार '**कथं वेद्धव्यं०**' इत्यादि भाष्यानें आरंभ करितात—]=त्या अक्षराला कसा वेध करावा, तें या मंत्रांत सांगितलें जातें.—'**औपनिषदं महास्त्रं धनुः गृहीत्वा**'—उपनिषदांत झालेलें प्रसिद्ध महत् अस्त्र—महास्त्ररूप धनुष्य—बाण फेकण्याचें साधन—घेऊन '**उपासानिशितं शरं संधयीत**'—त्यावर उपासनेनें तीक्ष्ण केलेला म्हणजे सतत अभिध्यानानें पाजळलेला—संस्कारयुक्त केलेला असा याचा भावार्थ; बाण जोडावा. त्या धनुष्याशीं बाणाचें संधान करावें आणि शरसंधान केल्यावर, धनुष्याला बाण जोडल्यावर '**आयम्य**'—त्याची प्रत्यंचा ओढावी. इंद्रियांसह अंतःकरणाला विषयांपासून परतवून लक्ष्याकडेच वळवावें, असा याचा अर्थ. '**न हि०**'—कारण हातानें धनुष्याच्या प्रत्यंचेला जसें ओढतात त्याचप्रमाणें येथें आकर्षण संभवत नाहीं. यास्तव '**तद्भावगतेन चेतसा**'—त्या लक्ष्यभूत अक्षर ब्रह्मामध्यें भावना धरून, भावनागत चित्तानें '**सोम्य तदेव अक्षरं लक्ष्यं विद्धि**'—हे सोम्य, त्या पूर्वोक्त लक्षणानें युक्त असलेल्या अक्षरसंज्ञक लक्ष्याला वेध कर ३.

**श्रुतिः—प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।**
**अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ॥४॥**

**अर्थ**—प्रणव हेंच धनुष्य आहे. सोपाधिक आत्मा हा शर आहे. ब्रह्म हें त्याचें लक्ष्य आहे, असें म्हटलेलें आहे. त्याला सावधान मनानें वेध करावा. शराप्रमाणें तन्मय व्हावें. ४

**भाष्यं—यदुक्तं धनुरादि तदुच्यते । प्रणव ओंकारो धनुः । यथेष्वासनं लक्ष्ये शरस्य प्रवेशकारणं तथाऽऽत्मशरस्याक्षरे लक्ष्ये प्रवेशकारणमोंकारः । प्रणवेन ह्यभ्यस्यमानेन संस्क्रियमाणस्तदालम्बनोऽप्रतिबन्धेनाक्षरेऽवतिष्ठते । यथा धनुषाऽऽस्त इषुर्लक्ष्ये । अतः प्रणवो धनुरिव धनुः ॥**

**भाष्यार्थ**—वर सांगितलेलें धनुष्य इत्यादि काय आहे, तें हा मंत्र सांगतो—'**प्रणवः**'—ओंकार, हेंच 'धनुष्य' आहे. ज्याप्रमाणें बाण सोडावयाचें स्थान म्हणजे धनुष्य लक्ष्याचे ठिकाणीं बाणाचा प्रवेश करविण्याचें निमित्त आहे त्याप्रमाणें आत्मरूप शराचा अक्षरसंज्ञक लक्ष्यामध्यें प्रवेश होण्यास ओंकार हें निमित्त आहे. सतत अभ्यास केल्या जाणाऱ्या प्रणवाच्या योगानें संस्कारयुक्त होणारा व प्रणवाचाच आश्रय केलेला आत्मा कोणत्याहि प्रकारच्या प्रतिबंधावांचून अक्षर ब्रह्माच्या ठिकाणीं राहतो. जसा बाण धनु-

ा योगानें लक्ष्यामध्यें जाऊन बसतो, त्याप्रमाणेंच आत्मा ब्रह्मामध्यें बसतो असें वें. यास्तव प्रणव हें जणुंकाय धनुष्य आहे. ( म्हणजे तो कांहीं खरोखरच ा नव्हे तर धनुष्यासारखा आहे. )

ाष्यं—शरो ह्यात्मोपाधिलक्षणः पर एव जले सूर्यादिवदिह प्रविष्टो देहे सर्व-प्रत्ययसाक्षितया। स शर इव स्वात्मन्येवार्पितोऽक्षरे ब्रह्मण्यतो ब्रह्म तल्ल-ुच्यते। लक्ष्य इव मनःसमाधित्सुभिरात्मभावेन लक्ष्यमाणत्वात्। तत्रैवं प्रमत्तेन बाह्यविषयोपलब्धितृष्णाप्रमादवर्जितेन सर्वतो विरक्तेन जितेन्द्रिये-ग्रचित्तेन वेद्धव्यं ब्रह्म लक्ष्यम्। ततस्तद्वेधनादूर्ध्वं शरवत्तन्मयो भवेत्। शरस्य लक्ष्यैकात्मत्वं फलं भवति तथा देहाद्यात्मप्रत्ययतिरस्करणेनाक्षरै-त्वं फलमापादयेदित्यर्थः ॥ ४ ॥

ाष्यार्थ—' आत्मा शरः '–उपाधिलक्षण आत्मा हा शर आहे. तो या देहांत बुद्धिप्रत्ययांचा साक्षी या रूपानें जलांत प्रतिबिंबित झालेल्या सूर्याप्रमाणें प्रविष्ट झाला . तो आत्मा शराप्रमाणें स्वात्म्यामध्येंच म्हणजे अक्षरब्रह्मामध्येंच अर्पिलेला आहे. व 'ब्रह्म तल्लक्ष्यं उच्यते'–ब्रह्म त्याचें लक्ष्य आहे, असें म्हटलें जातें. लक्ष्याप्रमाणेंच समाधान करण्याची इच्छा करणारांकडून आत्मभावानें लक्षित गेला जात असल्या- अक्षरात्मा जणुंकाय लक्ष्य आहे आणि अशी वस्तुस्थिति असल्याकारणानें प्रमत्तेन वेद्धव्यं '–अप्रमत्त होऊन, बाह्य विषयांच्या उपलब्धीविषयींची तृष्णा प्रमादानें रहित, सर्वतः विरक्त, जितेंद्रिय, एकाग्र चित्तानें युक्त होऊन ब्रह्मरूप ाला वेध करावा आणि त्याला वेध केल्यानंतर ' शरवत् तन्मयः भवेत् '–शरा-ं तन्मय व्हावें. ज्याप्रमाणें शराचें लक्ष्याशीं तादात्म्य, त्याच्याशीं एकरूप होणें ल आहे त्याप्रमाणें देहादिकच आत्मा आहे, या प्रत्ययाच्या तिरस्करणानें अक्षर-त्म्य हें फल प्राप्त करून घ्यावें, असा याचा इत्यर्थ. [ प्रणवच ब्रह्म आहे, असें करणाऱ्या व इंद्रियसमूहास स्ववश ठेवणाऱ्या पुरुषाला प्रणवोपरक्त चित्प्रतिबिंब ा असतें. म्हणजे त्या प्रणवानें मर्यादित झालेलें चिद्भान होत असतें. तोच आत्मा, अनुसंधान करणें, हेंच प्रणवाचे ठायीं शरसंधान व त्या चित्प्रतिबिंबाचें बिंबाशीं आहे, असें अनुसंधान करणें हाच लक्ष्यवेध आहे. व्यवहारांत निशाण मारणारे ज्यावर नेम धरितात तें लक्ष्य होय. ] ४.

ुतिः—यस्मिन्द्यौः पृथिवी चान्तरिक्षमोतं मनः सह प्राणैश्च सर्वैः।
तमेवैकं जानथ आत्मानमन्या वाचो विमुञ्चथामृतस्यैष सेतुः॥५॥

अर्थ—ज्याच्यामध्यें द्युलोक, पृथिवी, अन्तरिक्ष व सर्व प्राणांसह मन ओवलेलें आहे त्याच एका आत्म्याला जाणा. त्यावांचून बाकीच्या सर्व वाणी सोडा. हा अमृताचा सेतु आहे ५

भाष्यं—अक्षरस्यैव दुर्लक्ष्यत्वात्पुनः पुनर्वचनं सुलक्षणार्थम् । यस्मिन्नक्षरे पुरुषे द्यौः पृथिवी चान्तरिक्षं चोतं समर्पितं मनश्च सह प्राणैः करणैरन्यैः सर्वै-स्तमेव सर्वाश्रयमेकमद्वितीयं जानथ जानीथ । हे शिष्याः आत्मानं प्रत्यक्स्वरूपं युष्माकं सर्वप्राणिनां च ज्ञात्वा चान्या वाचोऽपरविद्यारूपा विमुञ्चथ विमुंचत परित्यजत तत्प्रकाश्यं च सर्वं कर्म ससाधनम् ॥

भाष्यार्थ—पण तें अक्षरच अतिशय दुर्लक्ष्य असल्यामुळें तें सुलक्षण व्हावें, त्याचें ज्ञान अनायासानें व्हावें, म्हणून श्रुति पुनः पुनः तेंच सांगत आहे. 'यस्मिन् द्यौः०' —ज्या अक्षर पुरुषामध्यें स्वर्गलोक, पृथिवी व अंतरिक्ष समर्पण केलेलें आहे 'च सर्वैः प्राणैः सह मनः'—व इतर सर्व इंद्रियांसह मनहि त्यांतच समर्पिलेलें आहे. 'तं एव एकं अत्मानं जानथ'—त्याच एका-अद्वितीय आत्म्याला सर्वाश्रयाला जाणा. हे शिष्यांनो, तुमच्या व इतर सर्व प्राण्यांच्या प्रत्यगात्म्यास जाणून 'अन्याः वाचः विमुञ्चथ'—अपर विद्यारूप अन्य वाणी सोडा, व त्या वाणीनें प्रकाशित होणारें साधना-सह सर्व कर्महि सोडा. ( साधनांसह सर्व कर्मांचा परित्याग करून आत्माच जाणावा, याविषयीं विशेष कारण 'यतः०' इत्यादि भाष्यानें सांगतात—)

भाष्यं—यतोऽमृतस्यैष सेतुरेतदात्मज्ञानममृतस्यामृतत्वस्य मोक्षस्य प्राप्तये सेतुरिव सेतुः संसारमहोदधेरुत्तरणहेतुत्वात्तथा च श्रुत्यन्तरम्—"तमेव विदि-त्वाऽतिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय" इति ॥ ५ ॥

भाष्यार्थ—कारण 'एषः अमृतस्य सेतुः'—हा अमृताचा सेतु आहे. हें आत्म-ज्ञान अमृतत्वाचा, मोक्षाच्या प्राप्तीकरितां लौकिक सेतूसारखा, सेतु आहे. कारण त्याचें ज्ञान संसारमहासागरांतून उतरून जाण्याचें, पार होण्याचें सेतूप्रमाणें निमित्त होत असतें. याविषयीं—"त्यालाच जाणून पुरुष मृत्यूचें अतिक्रमण करून जातो; परमात्म्याला जाऊन पोंचण्यास दुसरा मार्ग नाहीं;"—सु. उ. ९३३—अशा अर्थाची दुसरी श्रुति आहे. ५

श्रुतिः—अरा इव रथनाभौ संहता यत्र नाड्यः स एषोऽन्तश्चरते बहुधा जायमानः
ओमित्येवं ध्यायथ आत्मानं स्वस्ति व पराय तमसः परस्तात् ॥६॥

अर्थ—रथचक्राच्या नाभीमध्यें जसे अर बसविलेले असतात त्याप्रमाणें ज्याच्यामध्यें नाड्या समर्पिलेल्या आहेत त्या हृदयामध्यें तो हा बहुत प्रकारें उत्पन्नसा होत आंतल्या आंत संचार करतो. त्या आत्म्याचें 'ओं' अशा रीतीनें ध्यान करा. तुम्हांला अविद्या तमाच्या पलीकडे असलेल्या पर तीरास जातांना विघ्न न येवो ६.

**भाष्यं—किं च । अरा इव । यथा रथनाभौ समर्पिता अरा एवं संहताः संप्रविष्टा यत्र यस्मिन्हृदये सर्वतो देहव्यापिन्यो नाड्यस्तस्मिन्हृदये बुद्धिप्रत्यसाक्षिभूतः स एष प्रकृत आत्माऽन्तर्मध्ये चरते चरति वर्तते । पश्यञ्शृण्वन्मन्वानो विजानन्बहुधाऽनेकधा क्रोधहर्षादिप्रत्ययैर्जायमान इव जायमानोऽन्तःकरणोपाध्यनुविधायित्वाद्वदन्ति लौकिका हृष्टो जातः क्रुद्धो जात इति । तमात्मानमोमित्येवमोंकारालम्बनाः सन्तो यथोक्तकल्पनया ध्यायथ चिन्तयत ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय '**अराः इव रथनाभौ**'–ज्याप्रमाणें रथचक्राच्या नाभीमध्यें अर समर्पिलेले–शिरकविलेले असतात त्याप्रमाणें '**यत्र नाड्यः संहताः**'–ज्या हृदयामध्यें सर्वतः देहास व्यापणाऱ्या नाड्या शिरकविलेल्या असतात त्या हृदयामध्यें '**सः एषः**' –तो हा बुद्धिप्रत्ययसाक्षी प्रकृत आत्मा '**अन्तः चरते**'–आंतल्या आंत संचार करितो. '**बहुधा जायमानः**–पाहणारा, ऐकणारा, मनन करणारा व विशेषतः जाणणारा असा तो 'बहुधा'–अतःकरणरूपी उपाधीच्या अधीन असल्यामुळें–तिच्या सारखा होणारा असल्यामुळें क्रोध-हर्ष इत्यादि प्रत्ययांनीं जणुं काय क्षणोक्षणीं उत्पन्नच होतो, असा भास होतो. म्हणून सामान्य जन 'तो हृष्ट झाला, आतां तो क्रुद्ध झाला' असें म्हणतात. '**ओं इत्येवं**'–त्या आत्म्याचें 'ओं' अशा प्रकारें, ओंकाराचा आधार धरून पूर्वोक्तप्रकारें '**ध्यायथ**'–ध्यान करा. त्याचें ओंकाराच्या द्वारा चिंतन करा.

**भाष्यं—उक्तं वक्तव्यं च शिष्येभ्य आचार्येण जानता । शिष्याश्च ब्रह्मविद्याविविदिषुत्वान्निवृत्तकर्माणो मोक्षपथे प्रवृत्ताः । तेषां निर्विघ्नतया ब्रह्मप्राप्तिमाशास्त्याचार्यः । स्वस्ति निर्विघ्नमस्तु वो युष्माकं पराय परकूलाय । परस्तात्कस्मादविद्यातमसः । अविद्यारहितब्रह्मात्मस्वरूपगमनायेत्यर्थः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—विद्वान् आचार्यांनें शिष्यास जें अवश्य सांगण्यासारखें होतें तें सांगितलें व शिष्यहि ब्रह्मविद्येला जाणण्याची इच्छा करणारे असल्यामुळें कर्मापासून निवृत्त होऊन मोक्षमार्गांत प्रवृत्त झाले. आतां आचार्य त्यांना निर्विघ्नपणें ब्रह्मप्राप्ति व्हावी असा आशीर्वाद देतात. '**वः पराय स्वस्तिः**'–तुम्हांला पर तीरास जात असतांना कांहीं विघ्न न येवो. तुम्ही निर्विघ्नपणें परतीरास जा. [ कर्मठ लोकांच्या संगतीनें कर्मश्रद्धा वाढणें व विषयश्रद्धाहि दृढ होणें, हे महावाक्यार्थाच्या ज्ञानाचे प्रतिबंध आहेत. यास्तव शिष्यांना अशा प्रकारचीं प्रतिबंधरूप विघ्नें न येवोत, अशी आचार्य आशा करितो. कारण एकदा वाक्यार्थज्ञान झालें असतां फलप्राप्तिविषयीं विघ्न येईल, अशी शंकाहि करणें व्यर्थ आहे.]=वर 'परतीर' असें म्हटलें आहे. पण तें कशाचें परतीर, अशी आकांक्षा राहूं नये, म्हणून या मंत्रांत '**तमसः परस्तात्**'–अविद्या तमाच्या पलीकडे

असलेल्या परतीरास, असें म्हटलें आहे. म्हणजे माझ्या या उपदेशानंतर अविद्यारहित ब्रह्मात्मस्वरूपास प्राप्त होत असतांना तुम्हांला कांहीं विघ्न न येवो, असा याचा इत्यर्थ.६

**श्रुतिः—यः सर्वज्ञः सर्वविद्यस्यैष महिमा भुवि दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः। मनोमयः प्राणशरीरनेता प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं संनिधाय तद्विज्ञानेन परिपश्यन्ति धीरा आनन्दरूपममृतं यद्विभाति ॥ ७ ॥**

**अर्थ**—जो सामान्यतः सर्व जाणतो व विशेषतः सर्व जाणतो, ज्याचा भूलोकीं हा महिमा आहे तो आत्मा दिव्य ब्रह्मपुरांतील म्हणजे प्रकाशमय हृदयकमलांतील आकाशांत प्रतिष्ठित आहे. तो मनोमय, प्राणशरीराचा नेता, पिण्डाकार अन्नांत बुद्धीची संस्थापना करून राहिला आहे. जें आनंदरूप अमृत विशेषतः भासतें तें आत्मतत्त्व विवेकी विज्ञानानें सर्वतः पूर्ण पाहतात. ७.

**भाष्यं—योऽसौ तमसः परस्तात्संसारमहोदधिं तीर्त्वा गन्तव्यः परविद्याविषय इति स कस्मिन्वर्तत इत्याह। यः सर्वज्ञः सर्वविद्व्याख्यातः। तं पुनर्विशिनष्टि। यस्यैष प्रसिद्धो महिमा विभूतिः। कोऽसौ महिमा। यस्येमे द्यावापृथिव्यौ शासने विधृते तिष्ठतः। सूर्याचन्द्रमसौ यस्य शासनेऽलातचक्रवदजस्रं भ्रमतः। यस्य शासने सरितः सागराश्च स्वगोचरं नातिक्रामन्ति॥**

**भाष्यार्थ**— (ब्रह्मलोकीं जाऊन तेथें प्रलयापर्यंत राहणें व शेवटीं हिरण्यगर्भासहवर्तमान मुक्त होणें, ही क्रममुक्ति आहे, असें आम्हीं ईशोपनिषद्भाष्यार्थांत सांगितलें आहे. मंद अधिकाऱ्यांस ती क्रममुक्ति हेंच ज्याचें फल आहे, असें सर्वेश्वरत्व, मनोमयत्व इत्यादि गुणविशिष्ट ब्रह्माचें हृदयकमलांत ध्यान करावयास सांगावें, असें सुचविण्याकरितां आचार्य '**योऽसौ०**' इत्यादि म्हणतात—)=हा जो अविद्यातमाच्या पलीकडे असणारा व संसारमहासागराचें उल्लंघन करून जाण्यास योग्य असलेला परविद्येचा प्रदेश तो कोठेंसा आहे, तें हा मंत्र सांगतो—जो 'सर्वज्ञ' व 'सर्वविद्' या दोन विशेषणांचें व्याख्यान वर—पृ.२१—केलें आहे. त्यालाच पुनः विशेषण देतात. '**यस्य एषः महिमा भुवि**'—ज्याचा हा प्रख्यात महिमा, ही प्रख्यात विभूति—ऐश्वर्य आहे; कोणता तो महिमा? ज्याच्या शासनांत—आज्ञेंत द्युलोक व भूलोक असे हे दोन लोक धारण केल्याप्रमाणें राहतात, सूर्य व चंद्र ज्याच्या शासनांत अलातचक्राप्रमाणें—गरगर फिरणाऱ्या चाकाप्रमाणें—कोलीताप्रमाणें—सतत भ्रमण करीत राहतात, ज्याच्या शासनांत राहणाऱ्याच नद्या व समुद्र आपापल्या विषयाचें उल्लंघन करीत नाहींत.

**भाष्यं—तथा स्थावरं जङ्गमं च यस्य शासने नियतम्। तथा चर्तवोऽयनेऽब्दाश्च यस्य शासनं नातिक्रामन्ति। तथा कर्तारः कर्माणि फलं च यच्छास-**

नात्स्वं स्वं कालं नातिवर्तन्ते स एष महिमा भुवि लोके यस्य स एष सर्वज्ञ एवंमहिमा देवः । दिव्ये द्योतनवति सर्वबौद्धप्रत्ययकृतद्योतने ब्रह्मपुरे ॥

**भाष्यार्थ**—'**तथा०**'—त्याचप्रमाणें स्थावर व जंगम ज्याच्या शासनांत नियत राहतें, तसेच ऋतु, अयनें, संवत्सर ज्याच्या शासनाचें अतिक्रमण करीत नाहींत, आणि त्याचप्रमाणें कर्ते पुरुष, कर्में व त्यांचें फल ज्याच्या शासनामुळें आपापल्या उचित कालास सोडून रहात नाहींत, हा अशा प्रकारचा महिमा या भूलोकीं ज्याचा आहे तो हा सर्वज्ञ व अशा महिम्यानें युक्त असलेला देव '**दिव्ये**'—द्योतनवान्—सर्व बुद्धिप्रत्ययकृत द्योतनानें प्रकाशानें युक्त असलेल्या '**ब्रह्मपुरे**'—ब्रह्मपुरांत प्रतिष्ठित आहे.

**भाष्यं**—ब्रह्मणोऽत्र चैतन्यस्वरूपेण नित्याभिव्यक्तत्वाद्ब्रह्मणः पुरं हृदयपुण्डरीकं तस्मिन्यद्व्योम तस्मिन्व्योम्न्याकाशे हृत्पुण्डरीकमध्यस्थे प्रतिष्ठित इवोपलभ्यते । न ह्याकाशवत्सर्वगतस्य गतिरागतिः प्रतिष्ठा वाऽन्यथा संभवति ॥

**भाष्यार्थ**—यांत ब्रह्म चैतन्यस्वरूपानें नित्य अभिव्यक्त झालें असल्याकारणानें हृदयकमल हें ब्रह्माचें पुर—नगर आहे. त्यांत '**व्योम्नि**'—जें आकाश आहे त्या हृदयकमलमध्यस्थ आकाशांत ' आत्मा ' जणुंकाय प्रतिष्ठित आहे, असा अनुभव येतो. तो खरोखरीच हृदयांत स्थित होतो, असें मानतां येत नाहीं. कारण आकाशाप्रमाणें सर्वगत असलेल्याचें जाणें, येणें, प्रतिष्ठित होणें इत्यादि संभवत नाहीं.

**भाष्यं**—स ह्यात्मा तत्रस्थो मनोवृत्तिभिरेव विभाव्यत इति मनोमयो मनउपाधित्वात्प्राणशरीरनेता प्राणश्च शरीरं च प्राणशरीरं तस्यायं नेता स्थूलाच्छरीराच्छरीरान्तरं प्रति । प्रतिष्ठितोऽवस्थितोऽन्ने भुज्यमानान्नविपरिणामे प्रतिदिनमुपचीयमानेऽपचीयमाने च पिण्डरूपान्ने हृदयं बुद्धिं पुण्डरीकच्छिद्रे संनिधाय समवस्थाप्य । हृदयावस्थानमेव ह्यात्मनः स्थितिर्न ह्यात्मनः स्थितिरन्ने ॥

**भाष्यार्थ**—असो; तोच त्या हृदयकमलांत स्थित असलेला आत्मा मनोवृत्तींच्या योगानेंच अनुभवास येतो, यास्तव तो ' मनोमय ' होय. मन ही त्याची उपाधि असल्यामुळें तो मनोमय आहे. तसाच ' तो प्राण व शरीर यांचा नेता '—नेणारा आहे. एका स्थूल शरीरापासून दुसऱ्या शरीराप्रत नेणारा आहे. तो '**अन्ने हृदयं संनिधाय**'—भक्षण केल्या जाणाऱ्या अन्नाच्या परिणामामध्यें—प्रतिदिवशीं वृद्धि पावून क्षय पावणाऱ्या पिंडरूप अन्नामध्यें बुद्धीला हृदयकमलच्छिद्रांत चांगल्या रीतीनें स्थापून, '**प्रतिष्ठितः**'—व्यवस्थित आहे. हृदयावस्थान हेंच आत्म्याची स्थिति आहे. कारण त्याची स्थिति अन्नांत नाहीं.

**भाष्यं**—तदात्मतत्त्वं विज्ञानेन विशिष्टेन शास्त्राचार्योपदेशजनितेन ज्ञानेन शमदमध्यानसर्वत्यागवैराग्योद्भूतेन परिपश्यन्ति सर्वतः पूर्णं पश्यन्त्युपलभन्ते धीरा

विवेकिन: आनन्दरूपं सर्वानर्थदु:खायासप्रहीणममृतं यद्विभाति विशेषेण स्वात्मन्येव भाति सर्वदा ॥ ७ ॥

**भाष्यार्थ**—‘ धीरा:तत् विज्ञानेन परिपश्यन्ति ’—विवेकी त्या आत्मतत्त्वास शम-दम-ध्यान-सर्वत्याग-वैराग्य यांच्या योगानें उत्पन्न झालेल्या व शास्त्र आणि आचार्य यांच्या उपदेशापासून उद्भवलेल्या ज्ञानानें पाहतात. तो सर्वत: परिपूर्ण आहे, अशी त्यांना प्रतीति येते. ‘ आनन्दरूपं अमृतं यत् विभाति ’—सर्व अनर्थ आणि त्यापासून होणारें दु:ख व आयास यानीं रहित असलेलें जें आनंदरूप अमृत तेंच त्या विवेक्याना सर्वदा स्वात्म्यामध्येंच विशेषत: भासतें ७.

श्रुति:—भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशया: ।
क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ८ ॥

**अर्थ**—त्या पर व अवर सर्वज्ञाला पाहिलें असतां या विद्वानाची हृदयग्रंथि सुटते; सर्व संशय तुटतात व याचीं कर्में क्षीण होतात ८.

**भाष्यं**—अस्य परमात्मज्ञानस्य फलमिदमभिधीयते । भिद्यते हृदयग्रन्थिरविद्यावासनाप्रचयो बुद्ध्याश्रय: काम: “कामा येऽस्य हृदि श्रिता:” इति श्रुत्यन्तरात् । हृदयाश्रयोऽसौ नाऽऽत्माश्रय: । भिद्यते भेद्ं विनाशमायाति ॥

**भाष्यार्थ**—आतां या परमात्मज्ञानाचें हें फल सांगितलें जात आहे–‘ तस्मिन्परावरे दृष्टे हृदयग्रंथि: भिद्यते ’—त्या परावर परब्रह्माला पाहिलें असतां हृदयग्रंथि भेद पावते. हृदयग्रंथि म्हणजे अविद्यावासनाप्रचय–अविद्येमुळें उद्भवलेल्या अनेक वासनांचा समुदाय, बुद्धीचा आश्रय करून राहणारा काम. कारण दुसऱ्या एका श्रुतींत ‘कामा येऽस्य हृदि श्रिता: ’—सु.उ. ७९—‘ म्हणजे याच्या हृदयांत जे काम स्थित आहेत, ते क्षीण होतात, असें म्हटलें आहे. हा काम हृदयाचा आश्रय करून राहणारा आहे. आत्म्याचा आश्रय करून राहणारा नाहीं. तो भेद पावतो म्हणजे विनाश पावतो.

**भाष्यं**—छिद्यन्ते सर्वज्ञेयविषया: संशया लौकिकानामामरणात्तु गङ्गास्रोतोवत्प्रवृत्ता विच्छेदमायान्ति । अस्य विच्छिन्नसंशयस्य निवृत्ताविद्यस्य यानि विज्ञानोत्पत्ते: प्राक्कनानि जन्मान्तरे चाप्रवृत्तफलानि ज्ञानोत्पत्तिसहभावीनि च क्षीयन्ते कर्माणि । न त्वेतज्जन्मारम्भकाणि प्रवृत्तफलत्वात् । तस्मिन्सर्वज्ञेऽसंसारिणि परावरे परं च कारणात्मनाऽवरं च कार्यात्मना तस्मिन्परावरे साक्षादहमस्मीति दृष्टे संसारकारणोच्छेदान्मुच्यत इत्यर्थ: ॥ ८ ॥

**भाष्यार्थ**–‘सर्वसंशया:०’—सामान्य लोकांच्या मनात मरेपर्यंत गंगेच्या प्रवाहाप्रमाणें एकसारखे राहणारे ज्ञेयाविषयींचे सर्व संशय विच्छेद पावतात, नाहींसे होतात. ज्याचे

वे संशय विच्छिन्न झाले आहेत व अविद्या निवृत्त झाली आहे 'अस्य सर्वकर्माणि
ीयन्ते च '–त्याचीं विज्ञान उत्पन्न होण्यापूर्वींचीं, फलोन्मुख न झालेलीं जन्मांतरींचीं
ज्ञानोत्पत्तीनंतर ज्ञानासह होणारीं- संचित क्रियमाण कर्में क्षीण होतात. [याच जन्मांत
ात्मसाक्षात्कार होण्यापूर्वी जीं कर्में घडलीं होतीं तीं व पूर्वीच्या अनेक जन्मार्जित
र्मांपैकीं जीं आपलें फल देण्यास सज्ज झालेलीं नाहींत तीं, अशीं सर्व संचित व आत्मज्ञान
ाल्यानंतर प्रारब्धबलानें घडणारीं क्रियमाण कर्में नष्ट होतात. ]=पण या जन्मास कारण
ालेलीं, या जन्माच्या आरंभास कारण होणारीं म्हणजेच ज्यांचें फल प्रवृत्त झालें आहे
ं क्षीण होत नाहींत.–'तस्मिन्ृ'–त्या सर्वज्ञ, असंसारी आणि कारणरूपानें 'पर' व कार्य-
पानें 'अवर' अशा परावर अक्षरास साक्षात् पाहिलें असतां म्हणजे 'तेंच मी आहें' असें
ाणलें असतां संसाराच्या कारणाचाच उच्छेद होत असल्यामुळें भूतात्मा मुक्त होतो.
भाष्यकारांनीं या मंत्राच्या व्याख्यानाच्या आरंभीं 'या परमात्मज्ञानाचें' असें म्हटलें
ाहे. त्याचा अर्थ–जीवन्मुक्ति हें ज्याचें फल आहे, अशा अद्वैतवाक्यार्थाच्या बोधाचें
क्रममुक्ति हें ज्याचें फल आहे, अशा उपासनेचें–असा समजावा. कारण येथें सांगितलेलें
ल त्या दोन्ही उपायांनीं प्राप्त होणारें आहे. पण येथें अशी एक शंका येते कीं, भाष्यांत
अविद्याग्रंथिप्रचय ेद पावतो' म्हणून जें म्हटलें आहे. त्याचा अर्थ काय ? बुद्धि
ाद्यमान असतांनाच अविद्यादिकांचा नाश होणें हें ज्ञानाचें फल मिळतें कीं तिची
िवृत्ति झाली असतां तें प्राप्त होतें ? पण यांतील पहिला पक्ष मानतां येत नाहीं. कारण
ाणत्याहि कार्याचें उपादान असतांना त्याचा–कार्याचा अत्यंत उच्छेद होणें अशक्य
ाहे. 'बुद्धीची निवृत्ति झाली असतां ज्ञानफल प्राप्त होतें' हा दुसरा पक्षहि मानतां येत
ाहीं. कारण ज्ञानाचा अज्ञानाशींच साक्षात् विरोध आहे, अशी प्रसिद्धि आहे. त्यामुळें
ानाला बुद्धिनिवृत्तीची फारशी अपेक्षा आहे, असें वाटत नाहीं. शिवाय स्वतः बुद्धिच
ानादि आहे कीं सादि ? 'या अक्षरापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें होतात' अशा
ार्थाच्या श्रुतीशीं विरोध येत असल्यामुळें बुद्धि अनादि म्हणजे जन्मरहित आहे, असें
हणतां येत नाहीं. बरें ती सादि म्हणजे उत्पन्न होणारी आहे, हा दुसरा पक्ष मान्य
ला तरी तोहि समंजस होत नाहीं. कारण ती सादि आहे, असें म्हटलें कीं, प्रलयामध्यें
ह्मज्ञानावांचूनच बुद्धीचा नाश संभवत असल्याकारणानें ब्रह्मज्ञान व्यर्थ होणार. शिवाय
ी सादि आहे, असें मानिल्यास तिचें उपादान काय असा प्रश्न येतो. बुद्धीचें उपादान
ारण साक्षात् ब्रह्म आहे, असें म्हटल्यास ब्रह्माचा उच्छेद झाल्याशिवाय बुद्धीचा
ात्यंत उच्छेद होणार नाहीं व माया हें तिचें उपादान कारण आहे, असें समजल्यास तिला
ाहणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणच्या ज्ञानानें तिचा उच्छेद होऊं शकणार नाहीं. कारण लौकिक

मायाव्याच्या–म्हणजे गारुडी, जादुगार इत्यादिकांच्या ठिकाणच्या मायेचा तिला पाहणाऱ्या पुरुषांना ‘ ही माया आहे ’ असें जरी कळलें तरी नाश होतो, असें कोठें आढळत नाहीं.

शिवाय बुद्धीचा उच्छेद, हें फल कोणाला मिळतें ? स्वत: बुद्धीचें तर तें नव्हे, हें उघड आहे. कारण स्वत:चा नाश हें मुळीं फलच होत नाहीं. तें आत्म्याचें आहे म्हणून समजावें तर आत्मा असंग असल्यामुळें तसें म्हणणेंहि शोभत नाहीं. दुसरें, आत्मा अविद्यादिकांचा आश्रय होऊं शकत नाहीं, हें म्हणणें श्रुतिविरुद्ध आहे. कारण याच श्रुतींत ‘ अविद्यायामन्तरे वर्तमाना:०’–मुं. १.२.८. व ‘ अनिशया शोचति मुह्यमान: ’ –मुं. ३. १. २.–असें म्हणून ‘आत्मे अविद्येंत राहतात व जीव दीनपणानें अविवेकी होऊन शोक करतो ’ असें म्हटलें आहे. बरें बुद्धीमध्यें असणारेंच अविद्यादि आत्म्याच्या ठिकाणीं आरोपिलें जातें म्हणून म्हणावें तर अध्यास करणें म्हणजे काय ? त्याच्यावर टाकणें कीं, भ्रांतीनें पाहणें ? यांतील पहिला अर्थ तर संभवत नाहीं. कारण एकाचा धर्म दुसऱ्या पदार्थाचे ठिकाणीं टाकितां येत नाहीं. भ्रांतीनें पाहणें, म्हणजे अध्यास करणें असें म्हणावें तर भ्रांतीनें पाहणारा कोण ? आत्मा तर नव्हेच. कारण तो अविद्यादिकांचा आश्रय आहे, असें तुम्ही वेदान्ती मुळीं मानीतच नाहीं. बुद्धि भ्रांतीनें पाहते, म्हणून समजावें तर ती आत्म्याला विषय करण्यास असमर्थ असल्यामुळें आत्मगत अविद्यादिकांस भ्रांतीनें पाहते, हें म्हणणें संभवत नाहीं. शिवाय ज्याला भ्रांति होते त्यालाच जेव्हां तत्त्वाचा अनुभव येईल तेव्हां त्या भ्रांतीची निवृत्ति होते, असा अबाधित अनुभव येत असल्याकारणानें बुद्धीला भ्रांति होते, असें समजल्यास तत्त्वाचाहि अनुभव तिलाच आला पाहिजे, हें उघड आहे. पण तुमच्या मतीं बुद्धि जड असल्यामुळें ती अनुभवाचा आश्रय होऊं शकत नाहीं. तस्मात् ‘ अविद्यावासनाप्रचय भेद पावतो ’ या भाष्याचा योग्य अर्थ आम्हांला दिसत नाहीं.

या शंकेचें समाधान असें–चित्तंत्र, अनादि, अनिर्वाच्य अविद्या चैतन्याला मर्यादित करून त्या स्वावच्छिन्न चैतन्याचें बुद्ध्यादिकाशीं तादात्म्य, या रूपानें विवर्त पावते, म्हणजे अविद्येच्या योगानें मर्यादित झालेल्या चैतन्याचें बुद्ध्यादि जड कार्यांशीं तादात्म्य करते. ती अविद्या ब्रह्मच आत्मा आहे, अशा प्रकारच्या साक्षात्कारानें निवृत्त होणारी आहे, असें मानलेलें असल्यामुळें अविद्याजन्य हृदयग्रंथीचा भेद श्रुतीनें सांगितला आहे. भाष्यकारांनीं अविद्यादिकांचा आश्रय बुद्धि आहे, असें जें म्हटलें आहे तें व्यवहारांत अविद्यादि हे अहंकाराचे धर्म होत असल्यामुळें व्यावहारिक दृष्टीनें म्हटलें आहे व आत्मा अविद्यादिकांचा आश्रय नाहीं, असें जें म्हटलें आहे तें तो निर्विकार आहे, या अभिप्रायानें म्हटलें आहे. अविद्यानिवृत्ति होऊन व्यवहार बाधित जरी झाला

प्रारब्धाच्या बलानें त्या बाधित व्यवहाराचीच अनुवृत्ति–पुनः पुनः भान कसें होऊं तें तें आम्हीं प्रकटार्थांत स्पष्टपणें सांगितलें आहे.त्यामुळें अविद्यानिवृत्तीनंतर जीवन्मुक्ति होण्यास कांहीं अडचण नाहीं. ] ८.

**श्रुतिः—हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलम् ।**
**तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥ ९ ॥**

**अर्थ**—ज्योतिर्मय श्रेष्ठ कोशांत अविद्यादि दोषरहित व निरवयव ब्रह्म आहे. तें ाेष व निरवयव असल्यामुळेंच शुभ्र आहे. सर्व ज्योतींची ज्योति जसें जें ब्रह्म ञा आत्मानुभवी जाणतात ९.

**भाष्यं—उक्तस्यैवार्थस्य संक्षेपाभिधायका उत्तरे मन्त्रास्त्रयोऽपि । हिरण्मये तिर्मये बुद्धिविज्ञानप्रकाशे परे कोशे कोश इवासेः । आत्मस्वरूपोपलब्धि-नत्वात्परं तत्सर्वाभ्यन्तरत्वात्तस्मिन् । विरजमविद्याद्यशेषदोषरजोमलवर्जितं । सर्वमहत्त्वात्सर्वात्मत्वाच्च । निष्कलं निर्गताः कला यस्मात्तन्निष्कलं निर-वामित्यर्थः। यस्माद्विरजं निष्कलं चातस्तच्छुभ्रं शुद्धं ज्योतिषां सर्वप्रकाशात्मना-न्यादीनामपि तज्ज्योतिरवभासकम् । अग्न्यादीनामपि ज्योतिष्ट्वमन्तर्गतब्रह्मा-चैतन्यज्योतिर्निमित्तमित्यर्थः । तद्धि परं ज्योतिर्यदन्यानवभास्यमात्मज्योति-यदात्मविद आत्मानं स्वं शब्दादिविषयबुद्धिप्रत्ययसाक्षिणं ये विवेकिनो विदु-जानन्ति त आत्मविदस्तद्विदुरात्मप्रत्ययानुसारिणः। यस्मात्परं ज्योतिस्तस्मात्त । तद्विदुर्नेतरे बाह्यार्थप्रत्ययानुसारिणः ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—या पुढील तिन्ही मंत्र वरील अर्थाचाच संक्षेप सांगणारे आहेत. **'हिर-मये परे कोशे'**–ज्योतिर्मय बुद्धिविज्ञानप्रकाश अशा पर कोशामध्यें, तरवारीच्या ञा–म्याना–सारख्या कोशांत; तो कोश आत्मस्वरूपाच्या उपलब्धीचें स्थान असल्या- ; व सर्वांच्या अभ्यंतरीं--आंत असल्यामुळें पर होय. असो; अशा त्या कोशांत **रजं'**–अविद्यादि सर्व दोषरूपी मलरहित **'ब्रह्म'** आहे. सर्वांहून मोठेपणा व सर्वांचें त्मत्व या दोन कारणांनीं त्याला ब्रह्म हें सार्थ नांव आहे. तें **'निष्कलं'**–कलारहित नेरवयव, असा याचा भावार्थ आहे; आणि ज्याअर्थी तें विरज व निष्कल आहे त्या-र्थी **'शुभ्रं'**–शुद्ध **'ज्योतिषां ज्योतिः'**–अग्निप्रभृति सर्वप्रकाशरूप ज्योतींचीहि ज्योति गजे अवभासक; अग्नि इत्यादिकांचेंहि प्रकाशरूपत्व त्यांत असलेल्या ब्रह्मात्मचैतन्य-ातीच्या निमित्तानेंच आहे, असा त्याचा इत्यर्थ. **' तत् यत् आत्मविदः विदुः'**–न्य प्रकाशरूप पदार्थांकडून प्रकाशित न होणारी जी आत्मज्योति तीच परज्योति होय. जे वेकी शब्दादि विषयांविषयींच्या बुद्धिप्रत्ययांच्या साक्षिभूत स्वात्म्यास जाणतात ते आत्म-

वेत्तेच त्याला जाणतात. कारण ते आत्मप्रत्ययाचे अनुसारी असतात. ज्याअर्थी ब्रह्म ही ज्योति आहे त्याअर्थी ते आत्मानुभवाचें अनुसरण करणारेच त्याला जाणतात. ब विषयानुभवाचें अनुसरण करणारे इतर बहिर्मुख जन त्यास जाणत नाहींत ९.

**श्रुतिः—न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्नि तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ १०**

**अर्थ**—त्या ब्रह्माच्या ठिकाणीं सूर्य प्रकाशमान होत नाहीं, चंद्र व तारा प्रकाशम होत नाहींत, या विजा प्रकाशमान होत नाहींत, मग हा अग्नि कोठून प्रकाशम होणार? हें सर्व स्वयंप्रकाशमान होणाऱ्या त्या परमेश्वराच्या मागून प्रकाशमान हो त्याच्या प्रकाशानें हें सर्व प्रकाशमान होतें. १०.

**भाष्यं—कथं तज्ज्योतिषां ज्योतिरित्युच्यते । न तत्र तस्मिन्स्वात्मभूते ब्रह्म सर्वावभासकोऽपि सूर्यो भाति । तद्ब्रह्म न प्रकाशयतीत्यर्थः । स हि तस्यै भासा सर्वमन्यदनात्मजातं प्रकाशयतीत्यर्थः । न तु तस्य स्वतः प्रकाशनसा र्थ्यम् । तथा न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निरस्मद्गोचरः ॥**

**भाष्यार्थ**—आतां ब्रह्म ज्योतींची ज्योति कशी, तें हा मंत्र सांगतो—' **न तत्र** ' त्या स्वात्मभूत ब्रह्माच्या ठिकाणीं इतर सर्व जड पदार्थांचा अवभासक—प्रकाश असाहि ' **सूर्य** '—प्रकाशमान होत नाहीं. तो त्या ब्रह्माला प्रकाशित करूं शकत ना तर उलट तोच त्याच्याच प्रकाशानें प्रकाशमान होऊन इतर सर्व अनात्मवर्गास प्रकाशि करितो, असा याचा भावार्थ. पण त्याच्यामध्यें स्वाभाविक प्रकाशनसामर्थ्य नसं त्याचप्रमाणें ' **चंद्र, तारा,** ' व या ' **विद्युत्** ' त्याच्या ठिकाणीं प्रकाशमान होत नाहीं त्याला प्रकाशित करण्यास समर्थ नाहींत. ' **अयं अग्निः कुतः** '—मग हा आम्हां साक्षात् दिसणारा अग्नि कोठून भासणार?

**भाष्यं—किं बहुना । यदिदं जगद्भाति तत्तमेव परमेश्वरं स्वतो भारूपत्व द्भान्तं दीप्यमानमनुभात्यनुदीप्यते । यथा जलोल्मुकाद्यग्निसंयोगादग्निं दहन्त नुदहति न स्वतस्तद्वत्तस्यैव भासा दीप्त्या सर्वमिदं सूर्यादि जगद्विभाति ॥**

**भाष्यार्थ—' तं एव भान्तं सर्वं अनुभाति '**—फार काय सांगावें, पण हें जगत् भासत आहे तेंहि स्वतःप्रकाशरूप असल्यामुळें स्वयंप्रकाशमान होणाऱ्या त परमेश्वराच्या मागून प्रकाशमान होत आहे. ज्याप्रमाणें जल, कोलीत इत्यादि अ संयोगामुळें अग्नि जाळूं लागला असतां त्याच्या मागून आपणहि जाळूं लागतें प स्वतः जाळीत नाहीं, त्याप्रमाणें त्या अक्षर ब्रह्माच्या प्रकाशानें—दीप्तीनें हें सर्व सूर्या जगत् विशेषप्रकारें प्रकाशमान होतें.

भाष्यं—यत एवं तदेव ब्रह्म भाति च विभाति च कार्यगतेन विविधेन
ासाऽतस्तस्य ब्रह्मणो भारूपत्वं स्वतोऽवगम्यते । न हि स्वतोऽविद्यमानं भास-
न्यस्य कर्तुं शक्नोति । घटादीनामन्यावभासकत्वादर्शनाद्भारूपाणां चाऽऽ-
त्यादीनां तद्दर्शनात् ॥ १० ॥

भाष्यार्थ—'यतः०'–ज्याअर्थी अशारीतीनें तें ब्रह्मच स्वतः भासतें व कार्यरूप
ांतील नानाप्रकारच्या दीप्तीनेंहि विशेषप्रकारें भासतें त्याअर्थी ब्रह्माचें प्रकाशरूपत्व
ाभाविक आहे, असें अवगत होतें. कारण स्वतःप्रकाशरूप नसलेला पदार्थ दुसऱ्या पदा-
ना प्रकाशित करण्यास समर्थ नसतो. घटादि प्रकाशरहित पदार्थ दुसऱ्या पदा-
ना प्रकाशित करीत असल्याचें आढळत नाहीं. पण सूर्यादि प्रकाशरूप पदार्थ इत-
ा प्रकाशित करीत असल्याचें आढळतें. १०.

श्रुतिः—ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण ।
अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥ ११ ॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि द्वितीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि द्वितीयमुण्डकं समाप्तम् ॥ २ ॥

अर्थ—हें अमृत ब्रह्मच पुढें भासत आहे. ब्रह्मच मागें, ब्रह्मच उजव्या हातास,
व्या हातास, खालीं व वर पसरलेलें आहे. हें सर्व जगत् हें वरिष्ठ ब्रह्मच आहे. ११

भाष्यं—यत्तज्ज्योतिषां ज्योतिर्ब्रह्म तदेव सत्यं सर्वं तद्विकारं वाचारम्भणं
कारो नामधेयमात्रमनृतमितरदित्येतमर्थं विस्तरेण हेतुतः प्रतिपादितं निगमन-
ानीयेन मन्त्रेण पुनरुपसंहरति ॥

भाष्यार्थ—ज्योतींची ज्योति असें जें ब्रह्म तेंच सत्य व त्याचा दुसरा सर्व विकार
वल वाणीनें बोलण्यापुरताच, शब्दमात्र आणि त्यामुळेंच अनृत–मिथ्या, हा अर्थ वर
स्तरपूर्वक हेतु देऊन प्रतिपादिला आहे. आतां पुनः या निगमनाच्या स्थानीं अस-
ल्या मंत्रानें त्याच प्रतिपादित अर्थाचा उपसंहार केला जात आहे.

भाष्यं—ब्रह्मैवोक्तलक्षणमिदं यत्पुरस्तादग्रे ब्रह्मैवाविद्यादृष्टीनां प्रत्यवभास-
नं तथा पश्चाद्ब्रह्म तथा दक्षिणतश्च तथोत्तरेण तथैवाधस्तादूर्ध्वं च सर्वतोऽ-
ादिव कार्याकारेण प्रसृतं प्रगतं नामरूपवदवभासमानम् । किंबहुना ब्रह्मै-
दं विश्वं समस्तमिदं जगद्वरिष्ठं वरतमम् । अब्रह्मप्रत्ययः सर्वोऽविद्यामात्रो
रज्ज्वामिव सर्पप्रत्ययः । ब्रह्मैवैकं परमार्थसत्यमिति वेदानुशासनम् ॥ ११ ॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयं मुण्डकं समाप्तम् ॥ २ ॥

भाष्यार्थ—'**ब्रह्म एव इदं अमृतं पुरस्तात्**'–पूर्वी ज्याचें लक्षण सांगितलें आहे तें हें ब्रह्मच पुढें भासत आहे. अविद्यादृष्टि पुरुषांच्या अग्रभागीं भासमान होणारें हे सर्व ब्रह्मच आहे. त्याचप्रमाणें '**ब्रह्म पश्चात्**'–त्यांच्या मागच्या बाजूस भासणारेंहि ब्रह्मच. तसेंच '**ब्रह्म दक्षिणतः०**'–उजव्या व डाव्या बाजूस, अधोभागीं व ऊर्ध्वभागीं भासणारें, तात्पर्य सर्वतः कार्यांच्या आकारानें '**प्रसृतं**'–पसरलेलें व अब्रह्मसें–परिच्छिन्नसें भासणारें '**इदं विश्वं वरिष्ठं**'–हें सर्व नाम-रूपयुक्त पदार्थजात ब्रह्मच आहे. फार काय सांगावें, पण हें समस्त विश्व ब्रह्मच आहे. हें सर्व जगत् अति श्रेष्ठ ब्रह्मच. [ असें जर आहे तर मग हा सर्व अब्रह्मप्रत्यय कां येतो ? म्हणजे सर्व एक फार मोठें तत्त्व आहे, असा ब्रह्मप्रत्यय न येतां प्रत्येक वस्तु पृथक् पृथक् मर्यादित आहे, असा अनुभव कां येतो ? म्हणून विचाराल तर सांगतों–]='**अब्रह्मप्रत्ययः०**'–हा सर्व अब्रह्मप्रत्यय रज्जूच्या ठिकाणच्या सर्पप्रत्ययाप्रमाणें अविद्यामात्र आहे, आणि ब्रह्मच एक परमार्थ सत्य आहे, हें वेदाचें अनुशासन–वेदाचा उपदेश आहे. (सर्व ज्योतींची ज्योति असें ब्रह्मच आपल्या विचित्र मायाशक्तीनें हे विविध भाव करीत असतें. यास्तव त्याचा विकार, असें हें सर्व जगत् ब्रह्मच आहे, असें म्हणून येथें जगाचें ब्रह्ममात्रत्व सांगितलें आहे. अशा प्रकारच्या उपदेशाला 'पदांच्या बाधसामानाधिकरण्यानें केलेला उपदेश,' असें म्हणतात. भ्रांत पदार्थाचा निषेध करून अभ्रान्त वस्तूचा बोध करावयाचा झाल्यास भ्रांत किंवा अभ्रांत अशा दोन्ही पदार्थांच्या वाचक शब्दांची एकच विभक्ति योजितात. हेंच वैयाकरणांना इष्ट असलेलें सामानाधिकरण्य होय. जसें–हा जो खांब म्हणून तुला वाटलें होतें तो पुरुष आहे. येथें भ्रांत पदार्थ आहे खांब व अभ्रांत पदार्थ आहे पुरुष. यास्तव भ्रांत खांबाचा बाध करून अभ्रांत पुरुषाचा बोध करावयाचा असल्यामुळें खांब व पुरुष या दोन शब्दांची प्रथमा ही एकच विभक्ति योजिली आहे. यास्तव त्यांचें सामानाधिकरण्य आहे. पण हें सामानाधिकरण्य बाध या अर्थी आहे. कारण त्यांत खांबाचा निषेध करून पुरुषाचें विधान करावयाचें आहे. त्याचप्रमाणें जगत् ब्रह्म आहे, या उपदेशांतहि जगत् व ब्रह्म यांचें बाधसामानाधिकरण्य जाणावें. त्या सामानाधिकरण्याच्या योगानें जगाच्या ब्रह्ममात्रत्वाचा बोध केला जातो. ) ११.

इति मुंडकोपनिषद्भाष्यार्थाच्या द्वितीय मुंडकाचें दुसरें खंड व हें दुसरें मुण्डकहि समाप्त झालें.

---

श्रुतिः—द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥ १ ॥

अर्थ—दोन सुपर्ण ( म्हणजे समान भावास प्राप्त होणारे किंवा पक्षी ), सदा कत्र राहणारे, समान आख्यानाचे ( ज्यांच्या अभिव्यक्तीचें कारण समान आहे ), से ते दोघे समान वृक्षाच्या आश्रयानें राहतात. त्यांतील एकजण मधुर कर्मफल ातो, आणि दुसरा स्वतः फल न चाखतांच केवल पाहतो. १.

भाष्यं—परा विद्योक्ता यया तदक्षरं पुरुषाख्यं सत्यमधिगम्यते । यदधिगमे दयग्रन्थ्यादिसंसारकारणस्याऽऽत्यन्तिकविनाशः स्यात् । तद्दर्शनोपायश्च योगो नुरावुपादानकल्पनयोक्तः । अथेदानीं तत्सहकारीणि सत्यादिसाधनानि वक्त-ानीति तदर्थमुत्तरारम्भः । प्राधान्येन तत्त्वनिर्धारणं च प्रकारान्तरेण क्रियते त्यन्तदुरवगाह्यत्वात्कृतमपि । तत्र सूत्रभूतो मन्त्रः परमार्थवस्त्ववधारणार्थ-पन्यस्यते ॥

भाष्यार्थ—जिच्या योगानें तें सत्य पुरुषसंज्ञक अक्षर जाणलें जातें ती परा विद्या ांगितली. ज्या सत्य तत्त्वाचा अधिगम–ज्ञान–साक्षात्कार झाला असतां हृदयग्रंथि इत्यादि सारकारणांचा आत्यंतिक–सकारण विनाश होतो, त्याच्या अधिगमाचा उपाय–योग नुष्यादिकांचें ग्रहण करणें, या कल्पनेनें सांगितला. ( योग हा त्याच्या ज्ञानाचा पाय आहे व त्याचेंच प्रतिपादन वर–मुं. २. २. ३-४–केलें आहे)=आतां त्या गाचीं सत्यादि सहकारी साधनें सांगावीं, म्हणून पुढील ग्रंथाचा आरंभ केला आहे; ाणि तत्त्वनिश्चय पूर्वी केलेला असला तरी तो चित्तावर आरूढ होणें, अत्यंत कठिण सल्यामुळें या पुढील ग्रंथांत तात्पर्यतः अन्य प्रकारानें तो करावयाचा आहे. आतां ार्थीं परमार्थ वस्तूच्या निश्चयार्थ ‘ द्वा सुपर्णा सयुजा सखया० ’ या सूत्ररूप मंत्राचा पन्यास केला जात आहे.

भाष्यं—द्वा द्वौ सुपर्णा सुपर्णौ शोभनपतनौ सुपर्णौ पक्षिसामान्याद्वा सु-र्णौ सयुजा सयुजौ सहैव सर्वदा युक्तौ सखाया सखायौ समानाख्यानौ स-नाभिव्यक्तिकारणावेवंभूतौ सन्तौ समानमविशेषमुपलब्ध्यधिष्ठानतयैकं वृक्षं क्षमिवोच्छेदनसामान्याच्छरीरं वृक्षं परिषस्वजाते परिष्वक्तवन्तौ । सुपर्णा-वैकं वृक्षं फलोपभोगार्थम् ॥

भाष्यार्थ—‘ द्वा सुपर्णा ’–दोन सुपर्ण, ‘ सु ’ म्हणजे शोभन, उचित व ‘ पर्ण ’ णजे पतन--गमन, ज्यांचें नियम्य-नियामकभावास प्राप्त होणें उचितच आहे. [ जीव ज्ञ असल्यामुळें ईश्वराच्या नियमनाचा विषय होतो व ईश्वर सर्वज्ञ असल्यामुळें निया-

मकशक्तीनें युक्त होतो- म्हणजे एकामध्यें नियम्य होण्याची योग्यता व दुसऱ्यामध्यें नियामक होण्याची योग्यता असणें, हें त्यांचें शोभनत्व–उचितत्व व नियम्य-नियामक-भावास प्राप्त होणें, हेंच पतन होय. 'द्वौ सुपर्णौ' याचा अर्थ असा–दोन उचित भावास प्राप्त होणारे. ]=अथवा वृक्षाचा आश्रय करणें, फल खाणें, इत्यादि पक्ष्यांचें सामान्य–तुल्यधर्मत्व–असल्यामुळें दोन सुपर्ण म्हणजे दोन पक्षी, असेंच समजावें. ते दोघे 'सयुजा'–सदा एकत्र राहणारे, परस्पर संबंध ठेवणारे, व 'सखाया'–म्हणजे समान आख्यानाचे, ज्यांच्या अभिव्यक्तीचें कारण समान आहे अशा प्रकारचे ते दोन सुपर्ण **'समानं वृक्षं परिषस्वजाते'**–समान वृक्षाचा म्हणजे त्याच–दोघांच्याहि उपलब्धीचें अधिष्ठान, अशा एकाच वृक्षाचा–शरीराचा; वृक्षाप्रमाणें नाश पावणें, हा धर्म शरीराचे ठिकाणींहि समान असल्यामुळें येथील वृक्ष म्हणजे शरीर. त्या एकाच वृक्षास आलिंगन देतात. त्याच्या आश्रयानें राहतात. दोन पक्ष्यांप्रमाणें फलोपभोगाकरितां एका वृक्षाचा आश्रय करून राहतात.

**भाष्यं**—अयं हि वृक्ष ऊर्ध्वमूलोऽवाक्शाखोऽश्वत्थोऽव्यक्तमूलप्रभवः क्षेत्रसंज्ञकः सर्वप्राणिकर्मफलाश्रयस्तं परिष्वक्तौ सुपर्णाविवाविद्याकामकर्मवासनाश्रयलिङ्गोपाध्यात्मेश्वरौ । तयोः परिष्वक्तयोरन्य एकः क्षेत्रज्ञो लिङ्गोपाधिवृक्षमाश्रितः पिप्पलं कर्मनिष्पन्नं सुखदुःखलक्षणं फलं स्वाद्वनेकविचित्रवेदनास्वादरूपं स्वाद्वत्ति भक्षयत्युपभुङ्क्तेऽविवेकतः । अनश्नन्नन्य इतर ईश्वरो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावः सर्वज्ञः सर्वसत्त्वोपाधिरीश्वरो नाश्नाति । प्रेरयिता ह्यसावुभयोर्भोज्यभोक्त्रोर्नित्यसाक्षित्वसत्तामात्रेण । स त्वनश्नन्नन्योऽभिचाकशीति पश्यत्येव केवलम् । दर्शनमात्रं हि तस्य प्रेरयितृत्वं राजवत् ॥ १ ॥

**भाष्यार्थ**—हाच वृक्ष 'ऊर्ध्वमूलः' म्हणजे उत्कृष्ट ब्रह्म ज्याचें मूल–अधिष्ठान आहे, असा; 'अवाक्शाखः'–प्राणादि निकृष्ट कार्यें, याच ज्याच्या जणुं काय शाखा आहेत असा 'अश्वत्थः'–उद्यां हा असेलच असा ज्याच्याविषयीं नियम करितां येत नाहीं असा; 'अव्यक्तमूलप्रभवः'–अव्याकृतनांवाच्या मूलापासून–उपादानापासून उत्पन्न होणारा; अज्ञान असेपर्यंत राहणारा, असा याचा भावार्थ; क्षेत्र या नांवाचा, व सर्व प्राण्यांच्या कर्मफलांचा आश्रय, अशा शरीरसंज्ञक वृक्षाचा आश्रय करून ते दोघे पक्षी राहतात. अविद्या, काम, कर्म व वासना यांचा आश्रय असें जें लिंगशरीर तीच ज्याची उपाधि आहे असा जीव व ईश्वर हे दोघे जणुं काय पक्ष्यासारखे आहेत. **'तयोः अन्यः'**–समान वृक्षास आलिंगन देऊन राहिलेल्या त्या दोघांपैकीं एक–क्षेत्रज्ञ लिंगोपाधि वृक्षाचा आश्रय केलेला, **'स्वादु पिप्पलं'**–गोड फल **'अत्ति'**–खातो. कर्मामुळें निष्पन्न झालेलें

सुख-दुःखलक्षण फल कीं जें अनेक विचित्र वेदना-अनुभवरूप आहे तें अविवेकानें खातो आणि 'अनश्नन् अन्यः अभिचाकशीति'–दुसरा नित्यशुद्ध-बुद्ध-मुक्त-स्वभाव सर्वज्ञ मायोपाधि ईश्वर तें खात नाहीं. भोज्य विषय व भोक्ता क्षेत्रज्ञ या दोहोंना तो आपल्या केवल नित्य साक्षित्वाच्या सत्तेनें प्रेरणा करणारा आहे. तो दुसरा पक्षी स्वतः फल न खातांच केवल पहातो मात्र. राजाप्रमाणें केवल पाहणें, हेंच त्याचें प्रेरयितृत्व आहे. १

**श्रुतिः—समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमानः।**
**जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः॥ २॥**

**अर्थ**—त्याच समान वृक्षामध्यें निमग्न झालेला पुरुष अनीशेनें दैन्यानें-मोहित होत्साता शोक करितो. पण तो ज्व्हां शांतचित्त होऊन योगी व कर्मी यांच्याकडून सेविल्या जाणाऱ्या त्या दुसऱ्या ईशाला पाहतो व सर्व जगत् हा याचाच महिमा आहे असा निश्चय करतो तेव्हां शोकरहित होतो २.

**भाष्यं—तत्रैवं सति समाने वृक्षे यथोक्ते शरीरे पुरुषो भोक्ता जीवोऽविद्याकामकर्मफलरागादिगुरुभाराक्रान्तोऽलाबुरिव सामुद्रे जले निमग्नो निश्चयेन देहात्मभावमापन्नोऽयमेवाहममुष्य पुत्रोऽस्य नप्ता कृशः स्थूलो गुणवान्निर्गुणः सुखी दुःखीत्येवंप्रत्ययो नास्त्यन्योऽस्मादिति जायते म्रियते संयुज्यते वियुज्यते च संबन्धिबान्धवैः॥**

**भाष्यार्थ**—अशी स्थिति असतांना '**समाने वृक्षे**'–समान वृक्षामध्यें म्हणजे वर सांगितलेल्या शरीरामध्यें निमग्न झालेला पुरुष अनीशेनें मोहित होत्साता शोक करितो. '**पुरुषः**' म्हणजे भोक्ता, जीव कीं जो अविद्या-काम-कर्म-फलासक्ति इत्यादिकांच्या गुरु भारानें आक्रांत झाला आहे. मोठ्या भारानें आक्रांत झालेला भोपळा जसा समुद्राच्या जलांत बुडतो त्याप्रमाणें '**निमग्नः**'–निश्चयानें देहादिकच आत्मा आहे, या भावास, या अवस्थेस प्राप्त झालेला, हा देहच मी, या अमक्याचा पुत्र, अमक्याचा नातु, कृश, स्थूल, गुणवान्, निर्गुण, सुखी, दुःखी, इत्यादि प्रत्ययांनीं युक्त असलेला व या देहाहून दुसरा कोणी आत्मा नाहीं, यास्तव तो उत्पन्न होतो, मरतो, म्ह० संबंधी जन व बांधव यांच्याशीं संयुक्त व वियुक्त होतो, असें समजणारा असा तो शरीरांत निमग्न होतो. ( निमग्न होण्याचा प्रकार वरील विशेषणांनीं दाखविला आहे. )

**भाष्यं—अतोऽनीशया न कस्यचित्समर्थोऽहं पुत्रो मम विनष्टो मृता मे भार्या किं मे जीवितेनेत्येवं दीनभावोऽनीशा तया शोचति संतप्यते मुह्यमानोऽनेकैरनर्थप्रकारैरविवेकतया चिन्तामापद्यमानः॥**

**भाष्यार्थ**—त्यामुळें '**अनीशया**'–अनीशेनें म्हणजे मी कोणाचें कांहीं करण्यास समर्थ नाहीं; माझा पुत्र नष्ट झाला, माझी भार्या मेली, आतां माझ्या जीविताचा काय उपयोग ? अशा प्रकारचा दीनभाव हीच अनीशा. तिच्या योगानें '**शोचति**'–शोक करितो, संतप्त होतो. '**मुह्यमानः**'–अविवेकामुळें अनेक प्रकारच्या अनर्थांनीं चिंतेस प्राप्त होणारा पुरुष शोक करितो, असा याचा संबंध. (आवरण व विक्षेप हीं दोन अविद्येचीं कार्यें आहेत. त्यांतील स्वतःच्या ईश्वरभावाचें ज्ञान नसणें, स्वतःचा ईश्वरभाव विसरणें, हें अनीशावरण; शोक करणें हा विक्षेप आणि या दोन्ही कार्यांस निमित्त होणारें अनादि अज्ञान हा मोह होय. त्यांतील अनादि-अज्ञानरूप मोहानें युक्त असलेला क्षेत्रज्ञ 'मी करतों' इत्यादि अनेक प्रकारांनीं क्षेत्राशीं तादात्म्य पावून चिंताग्रस्त होतो, असा भावार्थ. )

**भाष्यं—स एवं प्रेततिर्यङ्मनुष्यादियोनिष्वाजवं जवीभावमापन्नः कदाचिदनेकजन्मसु शुद्धधर्मसंचितनिमित्ततः केनचित्परमकारुणिकेन दर्शितयोगमार्गोऽहिंसासत्यब्रह्मचर्यसर्वत्यागशमदमादिसंपन्नः समाहितात्मा सञ्जुष्टं सेवितमनकैर्योगमार्गैः कर्मभिश्च यदा यस्मिन्काले पश्यति ध्यायमानोऽन्यं वृक्षोपाधिलक्षणाद्विलक्षणमीशमसंसारिणमशनायापिपासाशोकमोहजरामृत्य्वतीतमीशं सर्वस्य जगतोऽयमहमस्म्यात्मा सर्वस्य समः सर्वभूतस्थो नेतरोऽविद्याजनितोपाधिपरिच्छिन्नो मायात्मेति विभूतिं महिमानं च जगद्रूपमस्यैव मम परमेश्वरस्येति यदैवं द्रष्टा तदा वीतशोको भवति सर्वस्माच्छोकसागराद्विप्रमुच्यते कृतकृत्यो भवतीत्यर्थः**

**भाष्यार्थ**—अशा प्रकारें प्रेत-तिर्यक्-मनुष्यादियोनींमध्यें सतत ( कर्मवायूनें प्रेरित झाल्यामुळें सत्वर) निकृष्टभावास प्राप्त झालेला, कदाचित् अनेक जन्मांतील शुद्ध धर्माच्या संचितामुळें कोणी महा कारुणिकानें ज्याला योगमार्ग दाखविला आहे, असा तो अहिंसा सत्य, ब्रह्मचर्य, सर्वस्वत्याग, शम, दम, इत्यादिकांनीं संपन्न व समाहितचित्त होत्साता '**जुष्टं**'–अनेक योगमार्गांनीं व कर्मांनीं सेविलेल्या '**अन्यं**'–वृक्षोपाधिलक्षण स्वतःहून विलक्षण, असंसारी व क्षुधा-तृषा शोक-मोह-जरा मृत्यु इत्यादिकांहून अगदीं पृथक् अशा सर्व जगाच्या '**ईशं**'–ईशास 'हा मी सर्वांचा आत्मा, सम व सर्व भूतांत स्थित आहें. त्याहून इतर अविद्याजनित उपाधीनें मर्यादित झालेला मायात्मा नाहीं,' असें त्या ईश्वराचेंच ध्यान करतां करतां '**यदा पश्यति**'–ज्यावेळीं पाहतो; '**अस्य महिमानं इति**'– त्या परमेश्वरस्वरूप अशा माझीच ही विभूति, हा जगद्रूप महिमा आहे, असें जेव्हां तो साक्षात् जाणतो तेव्हां '**वीतशोकः**'–शोकरहित होतो. सर्व शोकसागरापासून सर्वथा मुक्त होतो, कृतकृत्य होतो, असा याचा भावार्थ. २

श्रुतिः—यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ।
तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरञ्जनः परमं साम्यमुपैति ॥ ३ ॥

अर्थ—जेव्हां साधक स्वयंज्योतिःस्वभाव, कर्ता, ईश व ब्रह्मरूप योनि, अशा त्याला पाहतो तेव्हां तो विद्वान् पुण्य व पाप या दोहोंचाहि नाश करून व निर्लेप होऊन परम साम्यास प्राप्त होतो. ३.

भाष्यं—अन्योऽपि मन्त्र इममेवार्थमाह सविस्तरम् । यदा यस्मिन्काले पश्यः पश्यतीति विद्वान्साधक इत्यर्थः । पश्यते पश्यति पूर्ववद्रुक्मवर्णं स्वयंज्योतिःस्वभावं रुक्मस्येव वा ज्योतिरस्याविनाशि कर्तारं सर्वस्य जगत ईशं पुरुषं ब्रह्मयोनिं ब्रह्म च तद्योनिश्चासौ ब्रह्मयोनिस्तं ब्रह्मयोनिं ब्रह्मणो वाऽपरस्य योनिं स यदा चैवं पश्यति तदा स विद्वान्पश्यः पुण्यपापे बन्धनभूते कर्मणी समूले विधूय निरस्य दग्ध्वा निरञ्जनो निर्लेपो विगतक्लेशः परमं प्रकृष्टं निरतिशयं साम्यं समतामद्वयलक्षणं द्वैतविषयाणि साम्यान्यतोऽर्वाञ्च्येवातोऽद्वयलक्षणमेतत्परमं साम्यमुपैति प्रतिपद्यते ॥ ३ ॥

भाष्यार्थ—हा पुढचा मंत्रहि पूर्वोक्त अर्थच सविस्तर सांगत आहे. 'यदा' ज्यावेळीं 'पश्यः '–पाहणारा विद्वान् साधक, असा भावार्थ. ' रुक्मवर्णं '–स्वयंज्योतिःस्वभाव अथवा रुक्माच्या म्हणजे सोन्याच्या वर्णाप्रमाणें ज्याची अविनाशी ज्योति आहे, जो ' कर्तारं ईशं पुरुषं ब्रह्मयोनिं '–सर्व जगाचा कर्ता व ईश आहे, जो पुरुष ब्रह्मरूप योनि–उत्पत्तिस्थान अथवा हिरण्यगर्भसंज्ञक अपर ब्रह्माची योनि आहे, अशा त्याला साधक जेव्हां ' पश्यते '–पाहतो ' तेव्हां ' तो विद्वान् ' पुण्य-पापे विधूय '–बंधनास कारण होणारीं शुभ व अशुभ कर्में समूल नाहींशीं करून, जाळून, ' निरञ्जनः ' –निर्लेप–क्लेशशून्य होत्साता ' परमं साम्यं उपैति '–अद्वयरूप निरतिशय साम्यास–समतेस प्राप्त होतो. द्वैतविषयक साम्यें या अद्वयलक्षण साम्याच्या अपेक्षेनें निकृष्टच आहेत. यास्तव तो विद्वान् साधक या अद्वयलक्षण परम साम्यास प्राप्त होतो. ३.

श्रुतिः—प्राणो ह्येष यः सर्वभूतैर्विभाति विजानन्विद्वान्भवते नातिवादी ।
आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥ ४ ॥

अर्थ—हा प्राण सर्व भूतांच्या द्वारा विविध प्रकारें प्रकाशमान होतो. त्याला आत्मत्वानें जाणणारा जो विद्वान् तो अतिवादी होत नाहीं. आत्मक्रीड, आत्मरति, क्रियावान्, ब्रह्मनिष्ठ, तो सर्व ब्रह्मवेत्त्यांमध्यें वरिष्ठ आहे. ४.

भाष्यं—किं च योऽयं प्राणस्य प्राणः पर ईश्वरो ह्येष प्रकृतः सर्वैर्भूतैर्ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तैः । इत्थंभूतलक्षणे तृतीया । सर्वभूतस्थः सर्वात्मा सन्नित्यर्थः

विभाति विविधं दीप्यते । एवं सर्वभूतस्थं यः साक्षादात्मभावेनायमहमस्मीति विजानन्विद्वान्वाक्यार्थज्ञानमात्रेण स भवते भवति न भवतीत्येतत्किमतिवाद्य- तीत्य सर्वानन्यान्वदितुं शीलमस्येत्यतिवादी । यस्त्वेवं साक्षादात्मानं प्राणस्य प्राणं विद्वानतिवादी स न भवतीत्यर्थः ॥

भाष्यार्थ—शिवाय 'यः प्राणः हि एषः सर्वभूतैः विभाति'-जो हा प्राणाचा प्राण, हा प्रकृत पर ईश्वरच ब्रह्मादि-स्तंबपर्यंत सर्व भूतांच्या योगानें उपलक्षित होत्साता सर्व भूतस्थ, सर्वात्मा होत्साता, असा याचा भावार्थ; विविध रूपानें प्रकाशमान होतो याप्रमाणें सर्वभूतांमध्यें स्थित असलेल्या त्याला 'विजानन् विद्वान्'-जो कोणी साक्षात् आत्मभावानें 'हा मी आहें' असें केवल महावाक्याच्या अर्थाच्या ज्ञानानें जाणतो 'अतिवादी न भवते'-तो अतिवादी होत नाहीं. (अतिवादी म्हणजे काय तें सांगतो.) आत्मतत्त्वास सोडून दुसऱ्या सर्व पदार्थांविषयीं बोलण्याचें ज्याचें शील आहे तो अतिवादी होय. पण जो अशा रीतीनें साक्षात् आत्म्याला, प्राणाच्या प्राणाला जाणतो तो अतिवादी होत नाहीं, असा भावार्थ.

भाष्यं—सर्वं यदात्मैव नान्यदस्तीति दृष्टं तदा किं ह्यसावतीत्य वदेत् । यस्य त्वपरमन्यद्दृष्टमस्ति स तदतीत्य वदति । अयं तु विद्वानात्मनोऽन्यन्न पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति । अतो नातिवदति ॥

भाष्यार्थ—जेव्हां सर्व आत्माच आहे, दुसरें कांहीं नाहीं, असें साक्षात् अनुभवास आलें तेव्हां तो विद्वान् त्याला सोडून दुसरें काय बोलणार ? ज्याला आत्म्याहून अन्य वस्तु दिसलेली असते, तो आत्म्याला सोडून बोलतो. पण हा विद्वान् तर आत्म्याहून दुसरें कांहीं पहात नाहीं, ऐकत नाहीं व जाणत नाहीं. त्यामुळें त्याला सोडून तो दुसऱ्या- विषयीं बोलत नाहीं.

भाष्यं—किंचाऽऽत्मक्रीड आत्मन्येव च क्रीडा क्रीडनं यस्य नान्यत्र पुत्र- दारादिषु स आत्मक्रीडः । तथाऽऽत्मरतिरात्मन्येव च रती रमणं प्रीतिर्यस्य स आत्मरतिः । क्रीडा बाह्यसाधनसापेक्षा । रतिस्तु साधननिरपेक्षा बाह्यविषयप्रीति- मात्रमिति विशेषः । तथा क्रियावाञ्ज्ञानाध्यानवैराग्यादिक्रिया यस्य सोऽयं क्रियावान् । समासपाठ आत्मरतिरेव क्रियाऽस्य विद्यत इति बहुव्रीहिमतुबर्थ- योरन्यतरोऽतिरिच्यते ॥

भाष्यार्थ—शिवाय 'आत्मक्रीडः'-आत्म्याच्या ठिकाणींच ज्याचें क्रीडन असतें, पुत्र, भार्या इत्यादि अन्य पदार्थांमध्यें नसतें तो आत्मक्रीड होय. त्याचप्रमाणें 'आत्मरतिः'- आत्म्याचे ठिकाणींच ज्याची रति-रमण-प्रीति आहे तो आत्मरति. क्रीडा बाह्य साध-

नांच्या अपेक्षेनें युक्त असते. पण रति म्ह० साधननिरपेक्ष केवल बाह्य विषयप्रीति, हा या दोन शब्दांच्या अर्थांत विशेष आहे. त्याचप्रमाणें '**क्रियावान्**'–ज्याची ज्ञान-ध्यान-वैराग्यादि क्रिया आहे तो हा क्रियावान् होय. आतां 'आत्मरतिःक्रियावान्' असा एकच समासपाठ घेतल्यास आत्मरति हीच ज्याची क्रिया आहे, असा त्याचा अर्थ होऊन बहुव्रीहि समास व 'वान्' ह्म० 'त्याच्यापाशीं असणें' या 'मतुप्-'अर्थी होणारा प्रत्यय यांतील एक अधिक होतो. [" पण आत्म्यामध्यें रति, आत्मरति, तीच ज्याची क्रिया आहे, तो आत्मरतिक्रियावान्, असा येथें एक '**मतुप्**-'प्रत्यय प्रतीत होतो, तेव्हां 'बहुव्रीहि व मतुप् यांतील एक अधिक होतो,' असें कसें म्हटलें आहे ?" खरें आहे, पण असमासपाठांत त्या दोहोंना अर्थवत्त्व आहे, असें झालें होतें. आणि समास-पाठांत बाह्य क्रियानिवृत्तीच्या लाभामुळें मतुप् विशिष्ट होतो, असा भावार्थ.]

**भाष्यं—केचित्त्वग्निहोत्रादिकर्मब्रह्मविद्ययोः समुच्चयार्थमिच्छन्ति । तच्चैष ब्रह्मविदां वरिष्ठ इत्यनेन मुख्यार्थवचनेन विरुध्यते । न हि बाह्यक्रीड आत्म-रतिश्च भवितुं शक्तः कश्चिद्बाह्यक्रियाविनिवृत्तो ह्यात्मक्रीडो भवति बाह्यक्रिया-त्मक्रीडयोर्विरोधात् । न हि तमःप्रकाशयोर्युगपदेकत्र स्थितिः संभवति । तस्माद-सत्प्रलपितमेवैतदनेन ज्ञानकर्मसमुच्चयप्रतिपादनम् ॥**

**भाष्यार्थ**—पण कांहीं वेदान्त-एकदेशी "आत्मरति व क्रियावान् या दोन विशेषणां-वरून 'अग्निहोत्रादि कर्म व ब्रह्मविद्या यांचा समुच्चय' हा अर्थ प्रतीत होतो" असें सम-जतात. पण तें त्यांचें समजणें '**एष ब्रह्मविदां वरिष्ठः**'–म्हणजे हा ब्रह्मवेत्त्यांतील वरिष्ठ आहे, या मुख्यार्थवाचक वचनाच्या विरुद्ध आहे. कारण बाह्य वस्तूंशीं क्रीडा करणारा कोणीहि आत्मरति होण्यास समर्थ नसतो. कारण बाह्य क्रियापांसून विशे-षतः निवृत्त झालेला पुरुषच आत्मक्रीड होतो. (त्यावांचून नाहीं.) कारण बाह्यक्रिया व आत्मक्रीडा यांचा विरोध आहे. अंधकार व प्रकाश यांची एकाच वेळीं एकत्र स्थिति संभवत नाहीं. तस्मात् या वचनानें ज्ञान व कर्म यांच्या समुच्चयाचें प्रतिपादन केलें आहे असें म्हणणें हें असत्प्रलपितच आहे.

**भाष्यं—" अन्या वाचो विमुञ्चथ " " संन्यासयोगात् " इत्यादिश्रुति-भ्यश्च । तस्मादयमेवेह क्रियावान्यो ज्ञानध्यानादिक्रियावान्सोऽभिन्नार्थमर्यादः संन्यासी य एवंलक्षणो नातिवाद्यात्मक्रीड आत्मरतिः क्रियावान्ब्रह्मनिष्ठः स ब्रह्मविदां सर्वेषां वरिष्ठः प्रधानः ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—कारण 'अन्य वाणी सोडा' –पृ.५५–'संन्यासयोगानें यति शुद्धचित्त होतात'–पृ.८६–इत्यादि श्रुति कर्मत्यागाविषयीं प्रमाण आहेत. यास्तव जो ज्ञान-ध्यानादि

क्रिया करणारा व वर्णाश्रमादि-अर्थांची मर्यादा न तोडणारा संन्यासी तोच येथें क्रियावान् होय. जो अशा लक्षणाचा अतिवाद न करणारा, आत्मक्रीड, आत्मरति व क्रियावान् ब्रह्मनिष्ठ तो सर्व ब्रह्मज्ञांमध्यें वरिष्ठ—प्रधान होय. ४.

**श्रुतिः—सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ।**
**अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥ ५ ॥**

**अर्थ**—हा आत्मा सत्यानें, तपानें, यथार्थ ज्ञानानें व ब्रह्मचर्यानें नित्य लभ्य आहे. ज्याला यत्नशील व दोषरहित संन्यासी पाहतात तो हा ज्योतिर्मय शुभ्र आत्मा अन्तःशरीरांत असतो.५.

**भाष्यं—अधुना सत्यादीनि भिक्षोः सम्यग्ज्ञानसहकारीणि साधनानि विधीयन्ते निवृत्तिप्रधानानि सत्येनानृतत्यागेन मृषावदनत्यागेन लभ्यः प्राप्तव्यः । किंच तपसा हीन्द्रियमनएकाग्रतया "मनसश्चेन्द्रियाणां च ह्यैकाग्र्यं परमं तपः" इति स्मरणात् । तद्ध्यनुकूलमात्मदर्शनाभिमुखीभावात्परमं साधनं तपो नेतरश्चान्द्रायणादि । एष आत्मा लभ्य इत्यनुषङ्गः सर्वत्र । सम्यग्ज्ञानेन यथाभूतात्मदर्शनेन ब्रह्मचर्येण मैथुनासमाचारेण । नित्यं सत्येन नित्यं तपसा नित्यं सम्यग्ज्ञानेनेति सर्वत्र नित्यशब्दोऽन्तर्दीपिकान्यायेनानुषक्तव्यः । वक्ष्यति च— "न येषु जिह्ममनृतं न माया च" इति ॥**

**भाष्यार्थ**—आतां या मंत्रांत यथार्थ आत्मज्ञानास साह्य करणाऱ्या व निवृत्तिच ज्यांमध्यें प्रधान आहे, अशा संन्याश्याच्या सत्यादि साधनांचें विधान केलें जात आहे. 'सत्यानें' म्हणजे अनृतत्यागानें, मिथ्या भाषणाच्या त्यागानें हा आत्मा लभ्य—प्राप्त होण्यास योग्य आहे. त्याचप्रमाणें 'तपाच्या योगानें' म्हणजे इंद्रियें व मन यांच्या एकाग्रतेनें; कारण 'मनाचें व इंद्रियांचें ऐकाग्र्य हेंच परम तप आहे,' असें स्मृतिवचन आहे. शिवाय तें पुरुषाला आत्मदर्शनाभिमुखीभाव देत असल्यामुळें [ पुरुषाच्या बाह्य प्रवृत्तीला निरोध करून आंतर प्रवृत्तीच्या द्वारा त्याला आत्मदर्शनाकडे वळवीत असल्यामुळें ] आत्मदर्शनास अनुकूल आहे. म्हणून तेंच तप परम साधन होय. इतर चांद्रायणादि तप नव्हे. सत्य, तप इत्यादिकांनीं हा आत्मा लभ्य आहे, असा सर्वत्र अन्वय जाणावा. त्याचप्रमाणें सम्यग्ज्ञानानें म्हणजे यथाभूत आत्मदर्शनानें व 'ब्रह्मचर्यानें' म्हणजे मैथुनाचें आचरण न केल्यानें हा आत्मा लभ्य आहे. नित्य म्हणजे सर्वदा. नित्य या शब्दाचा उंबऱ्यांत ठेविलेल्या दिव्याच्या न्यायानें सत्य, तप, सम्यग्ज्ञान इत्यादि सर्व साधनांशीं संबंध जोडावा. 'ज्यांच्यामध्यें कपट, असत्य व माया नाहीं' असें याच उपनिषदांत पुढें सांगावयाचें आहे.

**भाष्यं**—कोऽसावात्मा य एतैः साधनैर्लभ्य इत्युच्यते । अन्तःशरीरेऽन्तर्मध्ये शरीरस्य पुण्डरीकाकाशे ज्योतिर्मयो हि रुक्मवर्णः शुभ्रः शुद्धो यमात्मानं पश्यन्त्युपलभन्ते यतयो यतनशीलाः संन्यासिनः क्षीणदोषाः क्षीणक्रोधादिचित्तमलाः । स आत्मा नित्यं सत्यादिसाधनैः संन्यासिभिर्लभ्यते । न कादाचित्कैः सत्यादिभिर्लभ्यते । सत्यादिसाधनस्तुत्यर्थोऽयमर्थवादः ॥ ५ ॥

**भाष्यार्थ**—पण या साधनांनीं लभ्य, असा हा आत्मा कोण, तें सांगतात–'**अन्तःशरीरे**'–शरीरामध्यें हृदयकमलांतील आकाशांत हा 'ज्योतिर्मय,' सुवर्णाच्या वर्णाचा व 'शुद्ध' आत्मा आहे. 'तं०'–त्याला यतनशील, ज्यांचे क्रोधादि चित्तमल क्षीण झाले आहेत असे संन्याशी पाहतात, अनुभव घेतात; नित्य सत्यादि साधनसंपन्न संन्याश्यांकडून तो आत्मा प्राप्त केला जातो, असा याचा भावार्थ. केव्हां केव्हां आचरणांत आणलेल्या सत्यादिकांच्या योगानें तो प्राप्त होत नाहीं. सत्यादि साधनांच्या स्तुतीकरितां हा अर्थवाद आहे. (या मंत्राच्या व्याख्यानास आरंभ करितांना 'सम्यग्ज्ञानसहकारीणि' म्हणजे यथार्थ आत्मज्ञानास साह्य करणारीं, असें सत्यादिसाधनांस विशेषण दिलें आहे. यास्तव येथील सम्यग्ज्ञान म्हणजे ब्रह्मसाक्षात्काररूप फलामध्यें परिणाम पावणारें वाक्यार्थ ज्ञान, असें समजावें. कारण महावाक्यार्थज्ञानाचें फल, अशा आत्मसाक्षात्काराला अविद्यानिवृत्ति हें आपलें कार्य करितांना इतर सहकारींची अपेक्षा नसते. अपरिपक्व ज्ञान व सत्यादि साधनें यांचा समुच्चय मात्र परिपक्व विद्येच्या लाभाकरितां इष्टच आहे. पण तेवढ्यानें भास्कराला इष्ट असलेल्या समुच्चयाची सिद्धि होत नाहीं. कारण परिपक्व विद्येला सहकारींची अपेक्षा असते, अशी कल्पना करण्यास कांहीं प्रमाण नाहीं. शिवाय 'परिपक्व आत्मज्ञानामुळें क्रियमाण कर्मांचा लेप लागत नाहीं,' व 'कर्मरहित देवांनाही मुक्ति मिळते,' असें श्रुतीनें सांगितलें आहे.) ५.

**श्रुतिः**—सत्यमेव जयति नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः । येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम् ॥ ६ ॥

**अर्थ**—सत्यवानाचाच विजय होतो. मिथ्या भाषण करणाराचा जय होत नाहीं. सत्याच्या योगानें देवयान मार्ग विस्तार पावला आहे. त्या मार्गानें पूर्णकाम ऋषी जेथें तें–'सत्य' या उत्तम साधनाचें साध्य व परम निधान परमात्मतत्त्व आहे तेथें जातात. ६

**भाष्यं**—सत्यमेव सत्यवानेव जयति नानृतं नानृतवादीत्यर्थः । न हि सत्यानृतयोः केवलयोः पुरुषानाश्रितयोर्जयः पराजयो वा संभवति । प्रसिद्धं लोके सत्यवादिनाऽनृतवाद्यभिभूयते न विपर्ययोऽतः सिद्धं सत्यस्य बलवत्साधनत्वम् । किं च शास्त्रतोऽप्यवगम्यते सत्यस्य साधनातिशयत्वम् ॥

**भाष्यार्थ**–'**सत्यं एव०**'–सत्यवानाचाच जय होतो. 'अनृताचा'–मिथ्या भाषण करणाऱ्याचा होत नाहीं, असा भावार्थ. [पण मूळ मंत्रांत 'सत्यमेव जयति नानृतं' म्हणजे सत्याचाच जय होतो, असत्याचा नाहीं, असें म्हटलेलें असतांना तुम्हीं त्याचा–सत्यवानाचा व मिथ्या भाषण करणाराचा–असा अर्थ करून सत्य व अनृत या शब्दांचा पुरुषाकडे संबंध कां लावितां ? असें कोणी विचारील म्हणून भाष्यकार '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण पुरुषाचा आश्रय न केलेल्या केवल सत्याचा व केवल असत्याचा जय किंवा पराजय संभवत नाहीं. सत्यवाद्याकडून मिथ्यावादी पराभूत केला जातो; पण त्याच्या उलट होत नाहीं, म्हणजे असत्यवाद्याकडून सत्यवादी पराभूत होत नाहीं, हें व्यवहारांत प्रसिद्ध आहे. यास्तव सत्य हें बलवान् साधन आहे, ही गोष्ट सिद्ध झाली. शिवाय शास्त्रावरूनहि सत्याचें साधनातिशयत्व म्हणजे सत्य हें सर्वांत अधिक योग्यतेचें साधन आहे, हें ज्ञात होतें.

**भाष्यं--कथम् । सत्येन यथाभूतवादव्यवस्थया पन्था देवयानाख्यो वितती विस्तीर्णः सातत्येन प्रवृत्तः । येन पथा ह्याक्रमन्ति क्रमन्त ऋषयो दर्शनवन्तः कुहकमायाशाठ्याहंकारदम्भानृतवर्जिता ह्याप्तकामा विगततृष्णाः सर्वतो यत्र यस्मिंस्तत्परमार्थतत्त्वं सत्यस्योत्तमसाधनस्य संबन्धि साध्यं परमं प्रकृष्टं निधानं पुरुषार्थरूपेण निधीयत इति निधानं वर्तते । तत्र च येन पथाऽऽक्रमन्ति स सत्येन वितत इति पूर्वेण संबन्धः ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—तें कसें म्हणून म्हणाल तर सांगतों–'**सत्येन०**'–जसें ठाऊक असेल तसें भाषण करणें या व्यवस्थेनें 'देवयाननांवाचा उत्तरायण मार्ग विस्तार पावला आहे;' सततपणें प्रवृत्त झाला आहे. '**येन**'–त्या मार्गानें कुहक–दुसऱ्याशीं वंचना करणें, माया–मनांत एक उद्देश धरून बाहेर निराळेंच सांगणें, शाठ्य–आपल्या शक्त्यनुसार दानादि न देणें, अहंकार–मिथ्या अभिमान, दंभ–धार्मिकतेचा बाह्य डौल, व अनृत–माहीत असेल त्याच्या विपरीत बोलणें, या दोषांनीं रहित असलेले, 'आप्तकाम'–तृष्णाशून्य '**ऋषि**' –दर्शनवान्–अतींद्रिय वस्तूला पाहणारे–' जातात. ' कोठें? '**यत्र०**' 'जेथें तें सत्यसंज्ञक उत्तम साधनांचें साध्य व सर्वोत्कृष्ट निधान असें परमार्थतत्त्व आहे, पुरुषार्थरूपानें जें ठेवलें जातें तें निधान होय. असो; त्या ठिकाणीं ज्या मार्गानें जातात तो सत्यानें विस्तारलेला आहे, असा या वाक्याचा पूर्ववाक्याशीं संबंध जोडावा ६.

**श्रुतिः—बृहच्च तद्दिव्यमचिन्त्यरूपं सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति ।**
**दूरात्सुदूरे तदिहान्तिके च पश्यत्स्विहैव निहितं गुहायाम् ॥ ७ ॥**

**अर्थ**--तें तत्त्व महत् आहे, दिव्य व अचिन्त्य रूप आहे. तें सूक्ष्माहून अत्यंत सूक्ष्म आहे, असें भासतें. तें अति दूर प्रदेशाहून अतिदूर व विद्वानांच्या दृष्टीनें अगदीं समीप आहे. येथेंच चेतनावान् जीवांमध्यें तें बुद्धिलक्षण गुहेंत स्थित आहे ७.

**भाष्यं—किं तत्किंधर्मकं च तादित्युच्यते--बृहन्महच्च तत्प्रकृतं ब्रह्म सत्यादिसाधनं सर्वतो व्याप्तत्वात् । दिव्यं स्वयंप्रभमनिन्द्रियगोचरमत एव न चिन्तयितुं शक्यतेऽस्य रूपमित्यचिन्त्यरूपम् । सूक्ष्मादाकाशादेरपि तत्सूक्ष्मतरं निरतिशयं हि सौक्ष्म्यमस्य सर्वकारणत्वाद्विभाति विविधमादित्यचन्द्राद्याकारेण भाति दीप्यते ॥**

**भाष्यार्थ**—( सत्याचें निधान म्हणून जें वर सांगितलें आहे, त्याचेंच पुनः विशेषणांच्या योगानें वर्णन करितात-) तें काय व कोणत्या धर्मांनीं युक्त आहे, तें या मंत्राकडून सांगितलें जातें, ‘ **बृहत् च तत्** ’-सत्यादि ज्याचीं साधनें आहेत असें तें प्रकृत ब्रह्म महत् आहे. कारण तें सर्वतः व्याप्त आहे. तें ‘ **दिव्यं** ’-स्वयंप्रकाश, अतींद्रिय-इंद्रियांचा विषय न होणारें, म्हणूनच **‘अचिंत्यरूपं’**-ज्याचें रूप चिंतन करण्यास शक्य नाहीं. **‘सूक्ष्माच्च’**-व आकाशादि सूक्ष्माहूनहि सूक्ष्मतर आहे. त्याचें रूप निरातिशय सूक्ष्म आहे. कारण तें सर्वांचें कारण आहे. **‘विभाति’**-तें आदित्य, चंद्र इत्यादिकांच्या आकारानें विविध भासतें.

**भाष्यं--किं च दूराद्विप्रकृष्टदेशात्सुदूरे विप्रकृष्टतरे देशे वर्ततेऽविदुषामत्यन्तागम्यत्वात्तद्ब्रह्म । इह देहेऽन्तिके समीपे च विदुषामात्मत्वात् । सर्वान्तरत्वाच्चाऽऽकाशस्याप्यन्तरश्रुतेः । इह पश्यत्सु चेतनावत्स्वित्येतन्निहितं स्थितं दर्शनादिक्रियावत्त्वेन योगिभिर्लक्ष्यमाणम् । क गुहायां बुद्धिलक्षणायाम् । तत्र हि निगूढं लक्ष्यते विद्वद्भिः । तथाप्यविद्यया संवृतं सन्न लक्ष्यते तत्रस्थमेवाविद्वद्भिः॥**

**भाष्यार्थ**--‘ **दूरात् सुदूरे** ’-तसेंच तें ब्रह्म दूर दूर देशाहूनहि अति दूर प्रदेशीं राहतें. कारण तें अविद्वानांना अत्यंत अगम्य आहे. तसेंच तें विद्वानांचा आत्माच असल्यामुळें ‘ **इह अन्तिके च** ’-या देहांत अगदीं समीप आहे. तें आकाशाच्याहि आंत आहे, अशी श्रुति असल्याकारणानें सर्वांच्या आंत राहणारें आहे म्हणूनहि तें येथें समीप आहे. **‘इह पश्यत्सु’**-या पाहणाऱ्या-चेतनावान् प्राण्यांमध्यें तें **‘निहितं’**-स्थित आहे. पाहणें, ऐकणें इत्यादि क्रियायुक्तत्व या धर्मानें योग्यांकडून तें लक्ष्यमाण होतें. (दर्शनादिक्रियांचा आधार या रूपानें योगी त्याला पाहतात.) पण तें कोठें? तर **‘गुहायां’**-बुद्धिरूप गुहेंत. कारण विद्वानांकडून तें बुद्धींतच अतिशय गूढ आहे असें

पाहिलें जातें. तथापि अविद्वानांकडून तें तेथेंच असलेलें तत्त्व, अविद्येनें आच्छादितसें होत्सातें, पाहिलें जात नाहीं. ७.

श्रुतिः—न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा ।
ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥८॥

**अर्थ**—पण त्याचें नेत्रांनीं ग्रहण करितां येत नाहीं, वाणीनें ग्रहण करितां येत नाहीं, इतर इंद्रियांनींहि त्याचें ग्रहण करितां येत नाहीं, तपानेंहि त्याचें ग्रहण होत नाहीं. अग्निहोत्रादि कर्मांच्या योगानेंहि त्याचें ग्रहण करितां येत नाहीं. तर बुद्धिप्रसादानें पुरुष शुद्धचित्त होतो. नंतर त्या सत्त्वशुद्धीनेंच ध्यान करणारा त्या निष्कल तत्त्वाला पाहतो. ८.

**भाष्यं**—पुनरप्यसाधारणं तदुपलब्धिसाधनमुच्यते । यस्मान्न चक्षुषा गृह्यते केनचिदप्यरूपत्वान्नापि गृह्यते वाचाऽनभिधेयत्वान्न चान्यैर्देवैरितरेन्द्रियैः । तपसः सर्वप्राप्तिसाधनत्वेऽपि न तपसा गृह्यते । तथा वैदिकेनाग्निहोत्रादिकर्मणा प्रसिद्धमहत्त्वेनापि न गृह्यते । किं पुनस्तस्य ग्रहणे साधनमित्याह ॥

**भाष्यार्थ**—हा मंत्र पुनः त्याच्या उपलब्धीचें असाधारण साधन सांगत आहे— कारण '**न चक्षुषा गृह्यते**'—तें रूपशून्य असल्यामुळें कोणालाहि नेत्रांनीं त्याचें ग्रहण करितां येत नाहीं. '**न अपि वाचा**'—शब्दानें सांगतां येण्यासारखें नसल्यामुळें वाणीनेंहि तें ग्राह्य होत नाहीं. '**अन्यैः देवैः न**'—इतर इंद्रियांनींहि त्याचें ग्रहण करितां येत नाहीं. '**तपसा**'—तप सर्वप्राप्तीचें साधन असलें तरी त्या तपाच्या योगानें त्याचें ग्रहण करवत नाहीं. '**कर्मणा**'—तसेंच ज्याचें महत्त्व अत्यंत प्रसिद्ध आहे अशा वैदिक अग्निहोत्रादि कर्मानेंहि तें ग्रहण केलें जात नाहीं. तर मग त्याच्या ज्ञानाचें साधन काय आहे ? तें मंत्र सांगतो—

**भाष्यं**—ज्ञानप्रसादेनाऽऽत्मावबोधनसमर्थमपि स्वभावेन सर्वप्राणिनां ज्ञानं बाह्यविषयरागादिदोषकलुषितमप्रसन्नमशुद्धं सन्नावबोधयति नित्यं संनिहितमप्यात्मतत्त्वं मलावनद्धमिवाऽऽदर्शम् । विलुलितमिव सलिलम् । तद्यदेन्द्रियविषयसंसर्गजनितरागादिमलकालुष्यापनयनादादर्शसलिलादिवत्प्रसादितं स्वच्छं शान्तमवतिष्ठते तदा ज्ञानस्य प्रसादः स्यात् ॥

**भाष्यार्थ**—'**ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वः**'—ज्ञानप्रसादानें, [येथें ज्ञान म्हणजे ज्ञानाचें साधन बुद्धि; तिच्या प्रसादानें ध्यान करणारा बुद्धिप्रसादास प्राप्त होतो व बुद्धिप्रसादाच्या योगानें पुरुष आत्म्यास पाहतो, असा येथें क्रम जाणावा. कारण संशयादिमलानें रहित असलेल्या प्रमाणभूत ज्ञानालाच तत्त्वसाक्षात्काराचें हेतुत्व आहे.

म्हणजे संशयादिरहित–निश्चित प्रमाणज्ञानच तत्त्वसाक्षात्काराचें कारण होतें, असा नियम आहे. ध्यानक्रिया यथार्थ ज्ञानाचें साधन होत नाहीं.]=सर्व प्राण्यांचें ज्ञान–बुद्धि स्वभावतःच आत्मावबोधनास समर्थ असलें तरी बाह्य विषयरागादिदोषांनीं कलुषित –अप्रसन्न, अशुद्ध, होत्सातें नित्य अगदीं समीप असलेल्याहि आत्मतत्त्वास, मलानें आच्छादित झालेल्या आरशाप्रमाणें, किंवा हालविलेल्या पाण्याप्रमाणें साक्षात् दाखविण्यास समर्थ होत नाहीं. आत्मतत्त्वाचा साक्षात् बोध करीत नाहीं. पण तेंच जेव्हां इंद्रिय व विषय यांच्या संसर्गामुळें होणाऱ्या रागादिमलानें उद्भवलेलें मलिनत्व घालविल्यानें आरसा किंवा जल, यांप्रमाणें प्रसन्न, स्वच्छ, शांत होऊन राहतें तेव्हां ज्ञानाचा–बुद्धीचा प्रसाद होतो.

**भाष्यं–तेन ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वो विशुद्धान्तःकरणो योग्यो ब्रह्म द्रष्टुं यस्मात्तस्तस्मात्तु तमात्मानं पश्यते पश्यत्युपलभते निष्कलं सर्वावयवभेदवर्जितं ध्यायमानःसत्यादिसाधनवानुपसंहृतकरण एकाग्रेण मनसा ध्यायमानश्चिन्तयन् ॥ ८॥**

**भाष्यार्थ**––त्या ज्ञानप्रसादानें ज्याचें अंतःकरण अतिशय शुद्ध झालें आहे असा साधक ब्रह्म पाहण्यास योग्य होतो. '**ततः तु०**'–आणि ज्याअर्थी असा प्रकार आहे त्याअर्थी सत्यादिसाधनसंपन्न व ज्यानें आपल्या सर्व इंद्रियांचा उपसंहार केला आहे, असा साधक एकाग्र मनानें चिंतन करूं लागला असतां त्या निष्कल–सर्व अवयवभेदरहित आत्म्यास पाहतो. ८.

**श्रुतिः—एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो यस्मिन्प्राणः पञ्चधा संविवेश ।**
**प्राणैश्चित्तं सर्वमोतं प्रजानां यस्मिन्विशुद्धे विभवत्येष आत्मा ॥ ९ ॥**

**अर्थ**—ज्यांत प्राण पांच प्रकारांनीं प्रविष्ट झाला आहे त्याच शरीरांत हा अणु आत्मा शुद्ध ज्ञानानें जाणावा. त्या आत्म्यानें प्रजांच्या इंद्रियांसह सर्व चित्ताला व्यापिलें आहे आणि ज्या विशुद्ध चित्तांत हा आत्मा आत्मरूपानें प्रकाशमान होतो ( त्या शुद्ध चित्तानें त्याला जाणावें. ) ९.

**भाष्यं—यमात्मानमेवं पश्यत्येषोऽणुः सूक्ष्मश्चेतसा विशुद्धज्ञानेन केवलेन वेदितव्यः । कासौ । यस्मिञ्शरीरे प्राणो वायुः पञ्चधा प्राणापानादिभेदेन संविवेश सम्यक्प्रविष्टस्तस्मिन्नेव शरीरे हृदये चेतसा ज्ञेय इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—ज्या आत्म्याला साधक अशा रीतीनें पाहतो '**एषः अणुः**'–तो आत्मा अणु–सूक्ष्म आहे. तो '**चेतसा**'–चित्तानें–केवल अतिशुद्ध ज्ञानानेंच–'**वेदितव्यः**'–जाणण्यास योग्य आहे. तो कोठें जाणण्यास योग्य आहे? '**यस्मिन् प्राणः पंचधा संविवेश**'–ज्या शरीरांत प्राणवायु प्राण-अपान इत्यादि भेदांनीं पांच प्रकारचा होऊन प्रविष्ट झाला आहे त्याच शरीरांतील हृदयांत चित्तानें जाणण्यास योग्य आहे, असा याचा अर्थ.

**भाष्यं—कीदृशेन चेतसा वेदितव्य इत्याह–प्राणैः सहेन्द्रियैश्चित्तं सर्वमन्तः करणं प्रजानामोतं व्याप्तं येन क्षीरमिव स्नेहेन काष्ठमिवाग्निना । सर्वं हि प्रजानामन्तःकरणं चेतनावत्प्रसिद्धं लोके । यस्मिंश्च चित्ते क्लेशादिमलवियुक्ते शुद्धे विभवत्येष उक्त आत्मा विशेषेण स्वेनाऽऽत्मना विभवत्यात्मानं प्रकाशयतीत्यर्थः९**

**भाष्यार्थ**—कशा प्रकारच्या चित्तानें तो जाणण्यास योग्य आहे, तें मंत्र सांगतो– '**प्रजानां प्राणैः चित्तं सर्वं ओतं**'–स्नेहानें जसें दुधाला किंवा अग्नीनें काष्ठाला व्यापावें त्याप्रमाणें प्रजांचें इंद्रियांसह सर्व अंतःकरण ज्यानें व्यापिलें आहे, कारण प्रजांचें सर्व अंतःकरण चेतनायुक्त आहे, हें लोकांत प्रसिद्ध आहे. ( बौद्धादिकांना चित्त, इंद्रियें इत्यादिकांमध्यें चेतनत्व आहे, असा भ्रम होतो. त्यावरून चित्त स्वतः- मध्यें व स्वतःशीं संसर्ग ठेवणारामध्यें चैतन्याची अभिव्यक्ति करण्यास स्वभावतःच योग्य आहे, असें ठरतें आणि अशा रीतीनें चित्तांत परमात्म्याच्या अभिव्यक्तीचा संभव असल्यामुळें 'तो चित्तानें जाणण्यास योग्य आहे' असें संभावनेकरितां येथें म्हटलें आहे. पण सर्वांचें चित्त चैतन्यानें जर व्याप्त आहे तर त्यांत ब्रह्म स्वतःच कां साक्षात् व्यक्त होत नाहीं, तें मंत्र सांगतो–)= '**यस्मिन् विशुद्धे एषः आत्मा विभाति**'– ज्या क्लेशादि-मलरहित शुद्ध चित्तांत पूर्वोक्त आत्मा विशेषतः स्वरूपानें प्रकट होतो, आपणाला त्यांत प्रकाशित करितो, असा याचा भावार्थ. ९

**श्रुतिः—यं यं लोकं मनसा संविभाति विशुद्धसत्त्वः कामयते यांश्च कामान् ।**
**तं तं लोकं जयते तांश्च कामांस्तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेद्भूतिकामः॥ १०**

इत्यथर्ववेदीयमुण्डकोपनिषदि तृतीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**अर्थ**—तो शुद्धचित्त आत्मवेत्ता मनानें ज्या ज्या लोकाची उत्तम भावना करितो अथवा ज्या उपभोगांची कामना करितो त्या लोकाला किंवा त्या कामांना जिंकितो. यास्तव ऐश्वर्याची इच्छा करणारानें आत्मज्ञाची पूजा करावी १०.

**भाष्यं—य एवमुक्तलक्षणं सर्वात्मानमात्मत्वेन प्रतिपन्नस्तस्य सर्वात्मत्वादेव सर्वावाप्तिलक्षणं फलमाह । यं यं लोकं पित्रादिलक्षणं मनसा संविभाति संकल्पयति मह्यमन्यस्मै वा भवेदिति विशुद्धसत्त्वःक्षीणक्लेश आत्मविन्निर्मलान्तःकरणः कामयते यांश्च कामान्प्रार्थयते भोगांस्तं तं लोकं जयते प्राप्नोति तांश्च कामान्संकल्पितान्भोगान् । तस्माद्विदुषः सत्यसंकल्पत्वादात्मज्ञमात्मज्ञानेन विशुद्धान्तःकरणं ह्यर्चयेत्पूजयेत्पादप्रक्षालनशुश्रूषानमस्कारादिभिर्भूतिकामो विभूतिमिच्छुः । ततः पूजार्ह एवासौ ॥ १० ॥**

इति मुण्डकोपनिषद्भाष्ये तृतीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥

**भाष्यार्थ**—[ आतां हा मंत्र निर्गुण उपासनेच्या स्तुतीकरितां सगुणविद्येचें फलहि साधकाच्या मनांत रुचि उत्पन्न करणाच्या उद्देशानें सांगतो; असें भाष्यकार **'य एवं'**–इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=अशा प्रकारें जो साधक पूर्वोक्त लक्षणाच्या सर्वात्म्यास आत्मरूपानें ओळखितो तो सर्वांचा आत्मा होत असल्याकारणानेंच त्याला सर्वप्राप्ति हें फल हा मंत्र सांगत आहे–तो मला किंवा दुसऱ्या कोणाला **'यं यं लोकं मनसा संविभाति'**–जो जो पित्रादि लोक प्राप्त व्हावा, अशी मनानें कल्पना करितो त्याचप्रमाणें तो **'विशुद्धसत्त्वः यान् कामान् कामयते'**–अतिशुद्धचित्त–क्लेशशून्य–निर्मलान्तःकरण आत्मवेत्ता ज्या भोगांची उत्कट इच्छा करितो **'तं तं०'**–त्या त्या लोकास व त्या संकल्पित भोगांस प्राप्त होतो. **'तस्मात्'**–येणेंप्रमाणें विद्वान् सत्यसंकल्प होत असल्यामुळें **'भूतिकामः'**–विभूतीची इच्छा करणारानें **'आत्मज्ञं'**–आत्मज्ञाची, आत्मज्ञानानें ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें आहे त्याची **'अर्चयेत्'**–पादप्रक्षालन, शुश्रूषा, नमस्कार इत्यादिकांच्या योगानें पूजा करावी. अर्थात् सत्यसंकल्पत्वामुळें आत्मज्ञ पूजार्हच होतो. १०

इति मुंडकोपनिषद्भाष्यार्थाच्या तिसऱ्या मुंडकाचें पहिलें खंड समाप्त.

**श्रुतिः**—स वेदैतत्परमं ब्रह्म धाम यत्र विश्वं निहितं भाति शुभ्रम्।
उपासते पुरुषं ये ह्यकामास्ते शुक्रमेतदतिवर्तन्ति धीराः ॥ १ ॥

**अर्थ**—तो हें पर ब्रह्म जाणतो. तें सर्व कामांचें आस्पद आहे. त्यांत समस्त जगत् अर्पिलेलें आहे. तें स्वयं प्रकाशमान होतें व शुद्ध आहे. त्या आत्मज्ञ पुरुषालाहि जे निष्काम मुमुक्षू सेवितात ते बुद्धिमान् या शरीरबीजाचें अतिक्रमण करितात. १.

**भाष्यं—यस्मात्स वेद जानातीत्येतद्यथोक्तलक्षणं ब्रह्म परममुत्कृष्टं धाम सर्वकामानामाश्रयमास्पदं यत्र यस्मिन्ब्रह्मणि धाम्नि विश्वं समस्तं जगन्निहितमर्पितं यच्च स्वेन ज्योतिषा भाति शुभ्रं शुद्धम्। तमप्येवमात्मज्ञं पुरुषं ये ह्यकामा विभूतितृष्णावर्जिता मुमुक्षवः सन्त उपासते परमिव सेवन्ते ते शुक्रं नृबीजं यदेतत्प्रसिद्धं शरीरोपादानकारणमतिवर्तन्त्यतिगच्छन्ति धीरा धीमन्तो न पुनर्योनिं प्रसर्पन्ति 'न पुनः क्वचिद्रतिं करोति' इति श्रुतेः। अतस्तं पूजयेदित्याभिप्रायः ॥ १॥**

**भाष्यार्थ**—**'सः वेद'**–ज्याअर्थी तो साधक हें पूर्वोक्त लक्षण ब्रह्म जाणतो त्याअर्थी त्याची पूजा करावी, असा अभिप्राय. **'एतत् परमं ब्रह्म धाम'**–तें ब्रह्म अतिशय उत्कृष्ट धाम आहे, सर्व कामांचें आश्रयस्थान आहे, **'यत्र विश्वं निहितं'**–ज्या ब्रह्मामध्यें–धामामध्यें समस्त जगत् समर्पण केलेलें आहे व **'भाति'**–जें स्वतःच्या ज्योतीनें–स्वयंप्रकाशानें भासतें, जें **'शुभ्रं'**–शुद्ध आहे, **'तं पुरुषं ये हि अकामाः उपासते'**–त्या अशा आत्मज्ञ पुरुषालाहि जे कामनाशून्य–विभूतींच्या तृष्णेनें रहित मुमुक्षू होऊन

सेवितात, पर ब्रह्माप्रमाणेंच त्या आत्मज्ञाची उपासना करितात, ते शुक्राचें म्हणजे शरीराचें उपादान कारण म्हणून प्रसिद्ध असलेल्या या मनुष्यबीजाचें अतिक्रमण करितात. म्हणजे ते बुद्धिमान् पुनः योनीस प्राप्त होत नाहींत.' तो पुनः कोठें प्रीति करीत नाहीं,' अशी याविषयीं श्रुति आहे. म्हणून ब्रह्मज्ञाची पूजा करावी, असा अभिप्राय. १.

श्रुतिः—कामान्यः कामयते मन्यमानः स कामभिर्जायते तत्र तत्र ।
पर्याप्तकामस्य कृतात्मनस्त्विहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः ॥ २ ॥

**अर्थ**—भोगांच्या गुणांचें चिंतन करणारा जो भोगांची इच्छा करितो तो त्या कामांच्या योगानें जेथें जेथें त्यांची प्राप्ति होणें शक्य असेल तेथें तेथें उत्पन्न होतो. पण ज्याच्या कामना पूर्ण झालेल्या असतात त्या कृतकृत्य पुरुषाचे सर्व भोग येथेंच पूर्णपणें लीन होतात. २.

**भाष्यं**—मुमुक्षोः कामत्याग एव प्रधानं साधनमित्येतद्दर्शयति । कामान्यो दृष्टादृष्टेष्टविषयान्कामयते मन्यमानस्तद्गुणांश्चिन्तयानः प्रार्थयते स तैः कामभिः कामैर्धर्माधर्मप्रवृत्तिहेतुभिर्विषयेच्छारूपैः सह जायते तत्र तत्र । यत्र यत्र विषयप्राप्तिनिमित्तं कामाः कर्मसु पुरुषं नियोजयन्ति तत्र तत्र तेषु तेषु विषयेषु तैरेव कामैर्वेष्टितो जायते ॥

**भाष्यार्थ**—मुमुक्षूला कामत्याग हेंच मुख्य साधन आहे, असें हा मंत्र दाखवितो. **'यः कामान् मन्यमानः कामयते'**—जो दृष्ट—ऐहिक व अदृष्ट—पारलौकिक इष्ट विषयांची, त्यांच्या गुणांचें चिंतन करीत, कामना करितो **'सः कामभिः तत्र तत्र जायते'**—तो त्या धर्माधर्मप्रवृत्तीस कारण होणाऱ्या विषयेच्छारूप कामांसह तेथें तेथें उत्पन्न होतो. (तेथें म्हणजे कोठें?) जेथें जेथें काम पुरुषास विषयप्राप्तीकरितां कर्मांत नियुक्त करितात त्या त्या प्रदेशांमध्यें त्याच कामांनीं वेष्टित होत्साता पुरुष उत्पन्न होतो.

**भाष्यं**—यस्तु परमार्थतत्त्वविज्ञानात्पर्याप्तकाम आत्मकामत्वेन परिसमन्तत आप्ताः कामा यस्य तस्य पर्याप्तकामस्य कृतात्मनोऽविद्यालक्षणादपररूपादपनीय स्वेन परेण रूपेण कृत आत्मा विद्यया यस्य तस्य कृतात्मनस्त्विहैव तिष्ठत्येव शरीरे सर्वे धर्माधर्मप्रवृत्तिहेतवः प्रविलीयन्ति विलयमुपयान्ति नश्यन्तीत्यर्थः । कामास्तज्जन्महेतुविनाशान्न जायन्त इत्यभिप्रायः ॥ २ ॥

**भाष्यार्थ**—**'तु पर्याप्तकामस्य'**—पण जो परमार्थतत्त्वाच्या साक्षात्कारामुळें सर्वथा प्राप्तकाम झालेला असतो म्हणजे केवल आत्म्याचीच इच्छा असल्यामुळें ज्याला समंततः सर्व काम प्राप्त झालेले असतात त्या पर्याप्तकाम—प्राप्तकाम **'कृतात्मनः'**—आणि जो कृतात्मा असतो म्हणजे ज्यानें विद्येच्या योगानें आत्मा अविद्यालक्षण अपर रूपापासून पृथक् करून आपल्या स्वाभाविक पररूपानें केलेला आहे त्या पर्याप्तकाम व कृतात्म

पुरुषाचे 'सर्वे '-सर्व धर्माधर्मप्रवृत्तींचे हेतू 'इह एव'-या जन्मींच, शरीरांत रहात असतांनाच 'प्रविलीयन्ति'-विलीन होतात, विलयास प्राप्त होतात, नाश पावतात, असा याचा अर्थ. कामांच्या उत्पत्तीचें निमित्तच नष्ट झाल्यामुळें ते उत्पन्न होत नाहींत, असा याचा अभिप्राय. ( विषयांचे ठिकाणीं असलेले दोष पाहिल्यामुळें ज्याची विषयेच्छाच क्षीण झाली आहे; म्हणजे हेंच विरुद्ध लक्षणेनें सांगावयाचें झाल्यास-'ज्याला आत्म्याची कामना असते त्याच्या चित्ताला आत्म्याला जाणण्याच्या इच्छेनेंच वश करून घेतलेलें असतें. त्यामुळें त्याचे काम विषयांपासून निवृत्तच होतात,' असा इत्यर्थ सांगतां येतो. सामान्यतः उत्पन्न झालेले काम ज्ञानावांचूनहि नाश पावत असतात. पण ज्ञानानें त्यांचें कारण-अविद्याहि नाश पावत असल्यामुळें ज्ञान्याला पुन: कामना होतच नाहींत. म्हणजे कामांचा नाश होणें यांत कांहीं विशेष नाहीं; तर त्यांच्या कारणाचा विनाश करून त्यांना पुन: उत्पन्नच न होऊं देणें, यांत खरा पुरुषार्थ आहे, असा अभिप्राय भाष्यकारांनीं व्यक्त केला आहे. ) २.

**श्रुतिः—नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥ ३ ॥**

**अर्थ**—हा आत्मा पुष्कळ वेदशास्त्राध्ययनानें प्राप्त होण्यासारखा नाहीं, धारणाशक्तीनें प्राप्त होण्याजोगा नाहीं व पुष्कळ श्रवणानेंहि मिळणारा नाहीं. तर तो विद्वान् ज्या परमात्म्याला प्राप्त होण्याची इच्छा करितो त्या वरणानेंच-त्या प्राप्त होण्याच्या इच्छेनेंच तो लभ्य आहे. त्याचा हा आत्मा आपल्या स्वरूपाला प्रकट करितो ३.

**भाष्यं—यद्येवं सर्वलाभात्परम आत्मलाभस्तल्लाभाय प्रवचनादय उपाया बाहुल्येन कर्तव्या इति प्राप्त इदमुच्यते । योऽयमात्मा व्याख्यातो यस्य लाभः परः पुरुषार्थो नासौ वेदशास्त्राध्ययनबाहुल्येन प्रवचनेन लभ्यः । तथा न मेधया ग्रन्थार्थधारणशक्त्या । न बहुना श्रुतेन नापि भूयसा श्रवणेनेत्यर्थः । केन तर्हि लभ्य इत्युच्यते । यमेव परमात्मानमेवैष विद्वान्वृणुते प्राप्तुमिच्छति तेन वरणेनैष परमात्मा लभ्यो नान्येन साधनान्तरेण । नित्यलब्धस्वभावत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—सर्व लाभांपेक्षां आत्मलाभच सर्वोत्तम आहे, हें जर खरें असेल तर त्याच्या लाभाकरितां प्रवचनादि उपाय पुष्कळ प्रमाणानें करणेंच उचित आहे, असें प्राप्त झालें असतां हा मंत्र म्हणतो-'**अयं आत्मा**'-हा जो आत्मा आम्हीं वर सांगितला आहे व ज्याचा लाभ होणें हाच परम पुरुषार्थ आहे, तो '**प्रवचनेन न लभ्यः**' -पुष्कळ वेद-शास्त्राध्ययनानें म्हणजे प्रवचनानें प्राप्त होण्याजोगा नाहीं. त्याचप्रमाणें '**मेधया न**'-मेधेनें म्हणजे ग्रंथाचा अर्थ धारण करण्याच्या शक्तीनें किंवा '**बहुना श्रुतेन**'

–उपनिषद्विचाररहित पुष्कळ श्रवणानें लभ्य नाहीं. तर मग तो कोणत्या उपायानें लभ्य आहे, तें या मंत्राचा उत्तरार्ध सांगत आहे. 'एष: यं एव वृणुते'–हा विद्वान् ज्या परमात्म्यालाच प्राप्त होण्याची इच्छा–वरण करतो, 'तेन लभ्य:'–त्या इच्छेनेंच –वरणानेंच हा परमात्मा लभ्य आहे. दुसऱ्या कोणत्याहि साधनानें नाहीं. कारण नित्य प्राप्त असणें, हाच त्याचा स्वभाव आहे. ( मी परमात्मा आहें, असें अभेदानुसंधान हेंच वरण आहे. वरण म्हणजे वरणें, इच्छा करणें, अशा प्रकारच्या वरणानेंच आत्मा लभ्य होतो. पण जो बहिर्मुख असतो त्यानें शतश: जरी श्रवणादि केलें तरी तो प्राप्त होत नाहीं. यास्तव मी परमात्मा आहें, या अभेदानुसंधानरूप परमात्मभजनासहवर्तमानच किंबहुना तत्पूर्वकच श्रवण, धारणाशक्ति, प्रवचन इत्यादि करावें; परमात्मभजनावांचून तें करूं नये, असा याचा अभिप्राय. असा अर्थ केल्यानें 'यमेवैष वृणुते तेन लभ्य:' या मंत्रभागाचा–हा विद्वान् ज्या परमात्म्याला वरतो त्या वरणानें–असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्यावर दोष येत नाहीं. नाहीं तर 'यं' या पदाचा 'तेन' या पदाशीं संबंध असणेंच सयुक्तिक होतें. पण तसा संबंध लाविल्यास 'ज्याला वरतो त्यानें लभ्य होतो' असा अयोग्य अर्थ झाला असता; तो न व्हावा म्हणून 'तेन' म्हणजे त्या वरणानें असा अर्थ आचार्यांनीं केला आहे. कारण येथें आत्मलाभाचें साधन सांगावयाचें आहे. किंवा 'यं' व 'तेन' या मंत्रस्थ पदांचाच संबंध लावावयाची इच्छा असल्यास–हाच परमात्म्यास वरतो व मुमुक्षुरूपानें व्यवस्थित असलेल्या त्या परमात्म्याच्या योगानेंच अभेदानुसंधानरूप वरणाच्या द्वारा परमात्मा लभ्य होतो; कर्मांच्या द्वारा लभ्य होत नाहीं, असा अर्थ करावा. )

**भाष्यं—कीदृशोऽसौ विदुष आत्मलाभ इत्युच्यते । तस्यैव आत्माऽविद्यासंछन्नां स्वां परां तनुं स्वात्मतत्त्वं स्वरूपं विवृणुते प्रकाशयति प्रकाश इव घटादिर्विद्यायां सत्यामाविर्भवतीत्यर्थ: । तस्मादन्यत्यागेनाऽऽत्मलाभप्रार्थनैवाऽऽत्मलाभसाधनमित्यर्थ: ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—पण विद्वानाला होणारा हा आत्मलाभ कशाप्रकारचा असतो? तें तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम्' हा मंत्रभाग सांगतो–त्याचा हा आत्मा अविद्येनें आच्छादित झालेली आपली उत्कृष्ट तनु–स्वात्मतत्त्वस्वरूप प्रकाशित करितो. प्रकाश पडला असतां जसे घट-वस्त्रादि पदार्थ व्यक्त होतात त्याप्रमाणें विद्या प्राप्त झाली असतां आत्मस्वरूप प्रकट होतें, असा याचा अर्थ. तस्मात् अन्य कामांचा त्याग करून आत्मलाभाची इच्छा करणें, हेंच आत्मलाभाचें साधन आहे, असा भावार्थ. ३.

**श्रुतिः—नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाऽप्यलिङ्गात्।**
**एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैव आत्मा विशते ब्रह्मधाम ॥ ४ ॥**

**अर्थ**—हा आत्मा वीर्यहीन पुरुषाकडून प्राप्त केला जात नाहीं; प्रमादानेंहि लभ्य नाहीं; किंवा लिंगरहित तपानेंहि तो प्राप्त करून घेतां येत नाहीं. तर या उपायांनीं जो विद्वान् यत्न करितो त्याचा हा आत्मा ब्रह्मधामांत प्रवेश करितो ४.

**भाष्यं—आत्मप्रार्थनासहायभूतान्येतानि च साधनानि बलाप्रमादतपांसि लिङ्गयुक्तानि संन्याससहितानि। यस्मादयमात्मा बलहीनेन बलप्रहीणेनाऽऽत्मनिष्ठाजनितवीर्यहीनेन न लभ्यो नापि लौकिकपुत्रपश्वादिविषयसङ्गनिमित्तप्रमादात्। तथा तपसो वाऽप्यलिङ्गाल्लिङ्गरहितात्। तपोऽत्र ज्ञानम्। लिङ्गं संन्यासः संन्यासरहिताज्ज्ञानान्न लभ्यत इत्यर्थः। एतैरुपायैर्बलाप्रमादसंन्यासज्ञानैर्यतते तत्परः सन्प्रयतते यस्तु विद्वान्विवेक्यात्मवित्तस्य विदुष एष आत्मा विशते संप्रविशति ब्रह्मधाम ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—बल, अप्रमाद व तप हीं चिह्नयुक्त म्ह० संन्याससहित आत्मप्रार्थनेचीं सहायभूत साधनें आहेत. कारण '**अयं आत्मा०**'—हा आत्मा बलहीनास—आत्मनिष्ठाजनित वीर्यानें हीन असलेल्या पुरुषास लभ्य नसतो. ( येथें वीर्य म्हणजे मिथ्याज्ञानानें पराभूत न होणारा एक अतिशय )='**न च०**'—त्याचप्रमाणें तो लौकिक पुत्र, पशु इत्यादि विषयसंगनिमित्त प्रमादानेंहि अलभ्य होतो. तसाच '**अलिंगात् तपसः अपि न लभ्यः**'—लिंगरहित तपाच्या योगानेंहि तो प्राप्त होत नाहीं. येथें तप म्हणजे ज्ञान, आणि लिंग म्हणजे संन्यास. संन्यासरहित ज्ञानानें प्राप्त होत नाहीं, असा याचा अर्थ. ( शंका—इंद्र, जनक, गार्गी इत्यादिकांनाहि आत्मलाभ झाल्याचें श्रुतीनें सांगितलें आहे. तेव्हां 'संन्यासरहित ज्ञानानें' असें येथें कां म्हटलें आहे? समाधान—तें खरें; पण संन्यास म्हणजे काय, तर सर्वत्याग. इंद्र, जनक इत्यादिकांनीं स्वत्वाचा अभिमान सोडलेला असल्यामुळें आंतर संन्यास त्यांच्या ठिकाणींहि होता. येथें बाह्य लिंगाचा जो निर्देश केलेला आहे तो विवक्षित नाहीं, विशेषतः त्याचें विधान येथें केलेलें नाहीं. कारण 'न लिङ्गं धर्मकारणम्' म्हणजे लिंग हेंच धर्माचें निमित्त नाहीं, असें स्मृतिवचन आहे.)='**तु**'—पण '**एतैः उपायैः**'—बल, अप्रमाद व संन्यासयुक्त ज्ञान या उपायांनीं '**यः विद्वान्**'—जो विवेकी—आत्मवेत्ता,विद्वान् '**यतते**'—तत्पर होऊन यत्न करितो '**तस्य एषः आत्मा ब्रह्मधाम विशते**'—त्या विद्वानाचा हा आत्मा ब्रह्मरूप धामामध्यें प्रवेश करितो ४.

**श्रुतिः—संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः।**
**ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाऽऽविशन्ति ॥ ५ ॥**

**अर्थ**—या आत्म्याला चांगल्या रीतीनें प्राप्त होऊन ऋषी ज्ञानानें तृप्त, कृतात्मे, तृष्णारहित व प्रशांत होतात. सर्वगामी ब्रह्माला सर्वत्र प्राप्त होऊन ते अत्यंत विवेकी युक्तात्मे मरणसमयींहि सर्व ब्रह्मामध्येंच प्रवेश करितात ५.

**भाष्यं—कथं ब्रह्म संविशत इत्युच्यते । संप्राप्य समवगम्यैनमात्मानमृषयो दर्शनवन्तस्तेनैव ज्ञानेन तृप्ता न बाह्येन तृप्तिसाधनेन शरीरोपचयकारणेन । कृतात्मानः परमात्मस्वरूपेणैव निष्पन्नात्मानः सन्तः । वीतरागाः वीतरागादिदोषाः । प्रशान्ता उपरतेन्द्रियाः । त एवंभूताः सर्वगं सर्वव्यापिनमाकाशवत्सर्वतः सर्वत्र प्राप्य नोपाधिपरिच्छिन्नेनैकदेशेन । किं तर्हि तद्ब्रह्मैवाद्वयमात्मत्वेन प्रतिपद्य धीरा अत्यन्तविवेकिनो युक्तात्मानो नित्यसमाहितस्वभावाः सर्वमेव समस्तं शरीरपातकालेऽप्याविशन्ति भिन्ने घटे घटाकाशवदविद्याकृतोपाधिपरिच्छेदं जहति । एवं ब्रह्मविदो ब्रह्मधाम प्रविशन्ति ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—त्याचा आत्मा ब्रह्मामध्यें कसा प्रवेश करितो तें हा पुढचा मंत्र सांगत आहे.—'**एनं संप्राप्य**'–या आत्म्याला यथार्थपणें जाणून '**ऋषयः**'–दर्शनवान् '**ज्ञानतृप्ताः**'–त्याच ज्ञानानें तृप्त झालेले, शरीराच्या वृद्धीस कारण होणाऱ्या बाह्य तृप्तिसाधनानें नव्हे, '**कृतात्मानः**'–ज्यांचे आत्मे परमात्मस्वरूपानेंच निष्पन्न झालेले असतात, '**वीतरागाः**'–जे रागादिदोषरहित असतात, '**प्रशान्ताः**'–ज्यांचीं इंद्रियें उपरत झालेलीं असतात, '**ते**'–अशा प्रकारचे ते '**सर्वगं**'–आकाशाप्रमाणें सर्वव्यापी असलेल्या ब्रह्माला '**सर्वतः प्राप्य**'–सर्वत्र प्राप्त होऊन, म्हणजे उपाधीच्या योगानें मर्यादित झालेल्या एकदेशानें नव्हे, तर तें अद्वय ब्रह्मच आमचा आत्मा आहे, असें जाणून '**धीराः**'–म्हणजे अत्यंत विवेकी व '**युक्तात्मानः**'–नित्य समाहितस्वभाव पुरुष '**सर्व एव**'–ब्रह्मामध्येंच शरीरपातसमयींहि म्हणजे मरणकालींहि '**आविशन्ति**'–प्रवेश करितात. घट फुटला असतां घटाकाश जसें महाकाशांत जाऊन मिळतें त्याचप्रमाणें विद्वान् शरीरपात होतांच उपाधिकृत मर्यादितपणाहि सोडतात. अशा प्रकारें ब्रह्मवेत्ते ब्रह्मधामांत प्रवेश करितात ५.

**श्रुतिः—वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ।**
**ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परमृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥ ६ ॥**

**अर्थ**—वेदान्तापासून उत्पन्न झालेल्या विज्ञानानें ज्यांचा विशेयार्थ अत्यंत निश्चित झाला आहे, ते सर्व संन्यासयोगानें यत्नशील व शुद्धचित्त होत्साते ब्रह्मलोकामध्यें देहत्यागाचे वेळीं परम अमृत होऊन सर्वतः मुक्त होतात ६.

**भाष्यं—किं च वेदान्तजनितविज्ञानं वेदान्तविज्ञानं तस्यार्थः परमात्मा विज्ञेयः सोऽर्थः सुनिश्चितो येषां ते वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः। ते च संन्यासयोगात्सर्वकर्मपरित्यागलक्षणयोगात्केवलब्रह्मनिष्ठास्वरूपाद्योगाद्यतयो यतनशीला शुद्धसत्त्वाः शुद्धं सत्त्वं येषां संन्यासयोगात्ते शुद्धसत्त्वाः। ते ब्रह्मलोकेषु संसारिणां ये मरणकालास्तेऽपरान्तास्तानपेक्ष्य मुमुक्षूणां संसारावसाने देहपरित्यागकालः परान्तकालस्तस्मिन्परान्तकाले साधकानां बहुत्वाद्ब्रह्मैव लोको ब्रह्मलोक एकोऽप्यनेकवद्दृश्यते प्राप्यते वा। अतो बहुवचनं ब्रह्मलोकेष्विति ब्रह्मणीत्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें '**वेदान्तविज्ञान०**'—वेदान्तापासून उत्पन्न झालेलें जें विज्ञान तें वेदान्तविज्ञान; त्या विज्ञानाचा अर्थ विज्ञेय—जाणण्यास योग्य—परमात्मा आहे. तो अर्थ ज्यांच्या चित्तांत अगदीं चांगल्या प्रकारें निश्चित झालेला असतो ते वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थ. ते '**संन्यासयोगात्**'—सर्वकर्मपरित्यागरूप केवल ब्रह्मनिष्ठास्वरूप संन्यासयोगामुळें '**शुद्धसत्त्वाः यतयः**'—ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे ते शुद्धचित्त यत्नशील '**ते ब्रह्म लोकेषु परान्तकाले**'—ते ब्रह्मलोकांमध्यें परान्तकालीं परामृत होऊन सर्व मुक्त होतात. संसारी पुरुषांचे जे मरणकाल ते अपरान्त; त्यांच्या अपेक्षेनें मुमुक्षूंच्या संसाराची परिसमाप्ति झाली असतां देहपरित्यागाचा जो काल तो परान्तकाल. त्या परान्तसमयीं, 'ब्रह्मलोकेषु'—ब्रह्म हाच लोक, असा कर्मधारय समास करावा. तो वस्तुत: जरी एक आहे तरी साधक पुष्कळ असल्यामुळें अनेक लोकांसारखा दिसतो, अथवा अनेक लोकांप्रमाणें प्राप्त केला जातो. म्हणून येथें 'ब्रह्मलोकेषु'—असें बहुवचन योजिलें आहे. पण त्याचा अर्थ ब्रह्मामध्यें असाच जाणावा.

**भाष्यं—परामृताः परममृतममरणधर्मकं ब्रह्माऽऽत्मभूतं येषां ते परामृता जीवन्त एव ब्रह्मभूताः परामृताः सन्तः परिमुच्यन्ति परि समन्तात्प्रदीपनिर्वाणवद्घटाकाशवच्च निवृत्तिमुपयान्ति। परिमुच्यन्ति परिसमन्तान्मुच्यन्ते सर्वे न देशान्तरं गन्तव्यमपेक्षन्ते॥**

**भाष्यार्थ**—'**परामृताः**'—परम—अमृत अमरणधर्मक ब्रह्म ज्यांच्या आत्मभूत आहे ते परामृत होत. जिवंतपणींच ब्रह्मभूत परामृत होऊन विझलेल्या दिव्याच्या ज्योतीप्रमाणें, अथवा घटाकाशाप्रमाणें, '**परिमुच्यन्ति**'—सर्वत: मुक्त होतात. सर्वतः निवृत्तीस प्राप्त होतात. (येथें निष्कर्मतेचा सहभाव, म्हणजे त्या आत्मज्ञानाबरोबर कर्मत्यागहि करावा, असें विवक्षित आहे. वातीच्या योगानें झालेला अवच्छेद नाहींसा झाला असतां दीपज्योति जशी सामान्यतेजोरूप होते, सर्वत्र पसरलेल्या सामान्य तेजांत

जाऊन मिळते त्याप्रमाणें )=सर्व आत्मज्ञ तत्काल सर्व बंधांपासून मुक्त होतात. स्वर्गासारख्या दुसऱ्या गंतव्य—जाण्यास योग्य देशाची अपेक्षा करीत नाहींत.

**भाष्यं**—" शकुनीनामिवाऽऽकाशे जल वारिचरस्य च । पदं यथा न दृश्येत तथा ज्ञानवतां गतिः "। " अनध्वगा अध्वसु पारयिष्णवः " इति श्रुतिस्मृतिभ्यः। देशपरिच्छिन्ना हि गतिः संसारविषयैव । परिच्छिन्नसाधनसाध्यत्वात् ॥

**भाष्यार्थ**—कारण ' आकाशांत पक्ष्यांचीं अथवा जलांत जलचर प्राण्यांचीं पावलें जशीं उमटलेलीं दिसत नाहींत, कारण तीं तेथें उमटलेलीं नसतातच त्याप्रमाणें ज्ञानवानांची गति दिसत नाहीं, ( कर्मठ व उपासक यांची क्रमानें दक्षिण व उत्तर मार्ग ही गति जशी शास्त्रावरून अवगत होते त्याप्रमाणें ज्ञान्याची गति उपलब्ध होत नाहीं)' अशा अर्थाच्या श्रुति व ' संसारमार्गांचें उल्लंघन करून—त्यांना संपवून पार जाण्याची इच्छा करणारे साधक मार्गप्राप्तीच्या साधनाचा आश्रय करीत नाहींत ' अशा अर्थाच्या स्मृति, याविषयीं प्रमाण आहेत. ( तर्कदृष्ट्या जरी पाहिलें तरी मोक्ष येथेंच होतो, असें आतां भाष्यकार सांगतात— )=देशतः मर्यादित झालेली गति संसारविषयच असणार, हें उघड आहे. कारण ती मर्यादित साधनांनीं साध्य होणारी असते.

**भाष्यं**—ब्रह्म तु समस्तत्वान्न देशपरिच्छेदेन गन्तव्यम् । यदि हि देशपरिच्छिन्नं ब्रह्म स्यान्मूर्तद्रव्यवदाद्यन्तवदन्याश्रितं सावयवमनित्यं कृतकं च स्यात् । न त्वेवंविधं ब्रह्म भवितमर्हति । अतस्तत्प्राप्तिश्च नैव देशपरिच्छिन्ना भवितुं युक्ता । अपि चाविद्यादिसंसारबन्धापनयनमेव मोक्षमिच्छन्ति ब्रह्मविदो न तु कार्यभूतम् ॥ ६ ॥

**भाष्यार्थ**—पण ब्रह्म समस्तरूप—अमर्याद असल्यामुळें देशकृत परिच्छेदानें तें गंतव्य—जाण्यास योग्य नाहीं. ब्रह्म जर देशतः परिच्छिन्न—मर्यादित असतें तर तें इतर मूर्त—साकार द्रव्यांप्रमाणें जन्म-नाशयुक्त, दुसऱ्याच्या आश्रयानें राहणारें, सावयव, अनित्य, व कृत्रिम झालें असतें. पण ब्रह्म अशा प्रकारचें होणें योग्य नव्हे. यास्तव त्याची प्राप्तिहि देशपरिच्छिन्न असणें उचित नाहीं. शिवाय ब्रह्मवेत्ते अविद्यादि-संसारबंधाचा अपनय-निरास करणें हाच मोक्ष आहे, असें इच्छितात. तो कार्यभूत आहे, असें समजत नाहींत. ६.

**श्रुतिः**—गताः कलाः पञ्चदश प्रतिष्ठा देवाश्च सर्वे प्रति देवातासु ।
कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्व एकी भवन्ति ॥ ७ ॥

**अर्थ**—प्राणादि पंधरा कला आपल्या प्रतिष्ठेस जाऊन पोंचल्या. त्याचप्रमाणें चक्षुःप्रभृति देव आपापल्या प्रतिदेवतांमध्यें प्राप्त होतात. मुमुक्षूचीं संचित कर्में व विज्ञानमय आत्मा इत्यादि सर्व त्या पर अव्यय आत्म्यामध्यें एकरूप होतात. ७.

**भाष्यं**—किं च मोक्षकाले या देहारम्भिकाः कलाः प्राणाद्यास्ताः स्वां स्वां प्रतिष्ठां गताः स्वं स्वं कारणं गता भवन्तीत्यर्थः। प्रतिष्ठा इति द्वितीयाबहुवचनम्। पञ्चदश पञ्चदशसंख्याका या अन्त्यप्रश्नपरिपठिताः प्रसिद्धा देवाश्च देहाश्रयाश्चक्षुरादिकरणस्थाः सर्वे प्रतिदेवतास्वादित्यादिषु गता भवन्तीत्यर्थः॥

**भाष्यार्थ**—तसेंच मोक्षसमयीं देहाचा आरंभ करणाऱ्या ज्या प्राणादि 'कला' त्या आपापल्या प्रतिष्ठेस गेल्या, आपापल्या कारणास जाऊन मिळाल्या, असें होतें. 'गताः कलाः पंचदश प्रतिष्ठाः' या मंत्रांतील 'प्रतिष्ठाः' हें द्वितीयाबहुवचन आहे. (आपल्या प्रतिष्ठांप्रत गेल्या आहेत, असें होतें, असें म्हणून भूतांचे अंश व भौतिक पदार्थ यांचा महाभूतांमध्यें लय दाखविला आहे.) 'पंचदश'—पंधरा कला कीं ज्या प्रश्नोपनिषदाच्या सहाव्या प्रश्नांत परिपठित आहेत. तसेच, सर्व देहाचा आश्रय करणारे, चक्षुःप्रभृति इंद्रियांमध्यें स्थित असणारे, सर्व प्रकाशरूप प्रख्यात देव प्रतिदेवतांमध्यें म्हणजे सूर्यादिकांमध्यें गत होतात. (मायामय महाभूतांच्या आधारामुळें प्रत्येक जीवाच्या अदृष्टाचें ज्यांना साह्य आहे अशा जीवाच्या आविद्यामय सूक्ष्म भूतांकडून प्रत्येकाचे प्राणादिक आरंभिले जातात. ते कर्मास अवश्य अपेक्षित असलेल्या सूर्यादि देवांकडून अधिष्ठित होतात. म्हणजे सूर्यादि देव त्यांचे अधिष्ठाते होतात. पुढें भोगांच्या योगानें कर्मे क्षीण झालीं असतां ते देव स्वस्थानीं जातात. नंतर प्रत्येक जीवाचें जें अविद्याकार्य तें सर्व ब्रह्मच होतें, असें आतां भाष्यकार 'यानि च०' इत्यादि भाष्यानें सांगतात—)

**भाष्यं**—यानि च मुमुक्षुणा कृतानि कर्माण्यप्रवृत्तफलानि प्रवृत्तफलानामुपभोगेनैव क्षीयमाणत्वाद्विज्ञानमयश्चाऽऽत्माऽविद्याकृतबुद्ध्याद्युपाधिमात्मत्वेन मत्वा जलादिषु सूर्यादिप्रतिबिंबवदिह प्रविष्टो देहभेदेषु कर्मणां तत्फलार्थत्वात्सह तेनैव विज्ञानमयेनाऽऽत्मना। अतो विज्ञानमयो विज्ञानप्रायः। त एते कर्माणि विज्ञानमयश्चाऽऽत्मोपाध्यपनये सति परेऽव्ययेऽनन्तेऽक्षये ब्रह्मण्याकाशकल्पेऽजेऽजरेऽमृतेऽभयेऽपूर्वेऽनपरेऽनन्तरेऽबाह्येऽद्वये शिवे शान्ते सर्व एकी भवन्त्यविशेषतां गच्छन्त्येकत्वमापद्यन्ते जलाद्याधारापनय इव सूर्यादिप्रतिबिम्बाः सूर्ये घटाद्यपनय इवाऽऽकाशे घटाद्याकाशाः॥ ७॥

**भाष्यार्थ**—मुमुक्षूनें केलेलीं जीं कर्मे, अर्थात् जीं फलोन्मुख झालेलीं नाहींत, कारण फल देण्यास प्रवृत्त झालेल्या कर्मांचा भोगाच्या योगानेंच क्षय केला जात असतो, त्याच प्रमाणें 'विज्ञानमय आत्मा' कीं जो अविद्याकृत बुद्ध्यादि उपाधींस आत्मा मानून जलादिकांत सूर्यादिकांच्या प्रतिबिंबाप्रमाणें या अनेक देहांमध्यें प्रविष्ट झालेला असतो; त्याच्या फलाकरितांच कर्मे असल्यामुळें तीं त्या विज्ञानमय आत्म्यासह (परब्रह्मांत मिळ-

तात, असा संबंध.) तस्मात् विज्ञानमय म्हणजे विज्ञानप्राय, ज्याच्यामध्यें विज्ञानाचें प्राचुर्य आहे, असा; तीं कर्में व विज्ञानमय आत्मा, '**सर्वे**'–हीं सर्व उपाधीचा क्षय झाला असतां आकाशासारख्या '**परे अव्यये**'–पर, अव्यय, अनन्त, अक्षय, अज, अजर, अमृत, अभय, अपूर्व, अनपर, अनन्तर, अबाह्य, शिव व शांत परब्रह्मामध्यें '**एकी भवन्ति**'–एकरूप होतात. आविशेषतेस–समानतेस प्राप्त होतात, एकत्वास प्राप्त होतात. जलादि आधार एकीकडे केला असतां सूर्यादिकांची प्रतिबिंबें जशीं सूर्यांत अथवा घटादि उपाधींचा निरास केला असतां घटादिकांनीं परिच्छिन्न झालेलें आकाश जसें आकाशांत एकरूप होतें त्याप्रमाणें कर्में, विज्ञानमय इत्यादि सर्व पर ब्रह्मांत ऐक्य पावतात ७.

**श्रुतिः—यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय।**
**तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ ८ ॥**

**अर्थ**—ज्याप्रमाणें सतत वाहणाऱ्या नद्या नाम व रूप यांचा त्याग करून समुद्रांत अस्त पावतात त्याप्रमाणें विद्वान् नाम व रूप यांपासून विशेषेंकरून मुक्त होत्साता परात्पर दिव्य पुरुषाला प्राप्त होतो ( तद्रूप होतो ) ८.

**भाष्यं—किं च यथा नद्यो गङ्गाद्याः स्यन्दमाना गच्छन्त्यः समुद्रे समुद्रं प्राप्यास्तमदर्शनमविशेषात्मभावं गच्छन्ति प्राप्नुवन्ति नाम च रूपं च नामरूपे विहाय हित्वा तथाऽविद्याकृतनामरूपाद्विमुक्तः सन्विद्वान्परादक्षरात्पूर्वोक्तात्परं दिव्यं पुरुषं यथोक्तलक्षणमुपैत्यपगच्छति ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—'ज्याप्रमाणें' एकसारख्या 'वाहत राहणाऱ्या' गंगादि 'नद्या' समुद्रास प्राप्त होऊन व 'नाम-रूप सोडून समुद्रांत अस्तास'–अदर्शनास, आविशेषात्मभावास, समान स्वरूपास 'प्राप्त होतात' '**तथा०**'–त्याप्रमाणें अविद्याकृत नाम-रूपापासून विशेषतः मुक्त झालेला विद्वान् पूर्वोक्त पर अक्षराहून पर–दिव्य पुरुषास प्राप्त होतो. त्या दिव्य पुरुषाचेंहि लक्षण वर–२. १. २. पृ. ३९–सांगितलें आहे ८.

**श्रुतिः–स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति।**
**तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रन्थिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥९॥**

**अर्थ**—जो कोणी या परम ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो. याच्या कुलांत अब्रह्मवेत्ता होत नाहीं. तो शोक व पाप यांचें उल्लंघन करितो. तो हृदयग्रंथीपासून विशेषतः मुक्त व अमृत होतो ९.

**भाष्यं—ननु श्रेयस्यनेके विघ्नाः प्रसिद्धा अतः क्लेशानामन्यतमेनान्येन वा देवादिना च विघ्नितो ब्रह्मविदप्यन्यां गतिं मृतो गच्छति न ब्रह्मैव। न। विद्ययैव सर्वप्रतिबन्धस्यापनीतत्वात्। अविद्याप्रतिबन्धमात्रो हि मोक्षो नान्यः प्रतिबन्धः। नित्यत्वादात्मभूतत्वाच्च ॥**

**भाष्यार्थ**—( **शंका** )—कल्याणकर अनुष्ठानांत अनेक विघ्नें उद्भवतात, हें प्रसिद्ध आहे. यास्तव क्लेशांतील कोणत्या तरी एका क्लेशानें किंवा देवादि दुसऱ्या कोणीं ज्यास विघ्न केलें आहे असा ब्रह्मवेत्ताहि मेल्यावर अन्य गतीस जातो; ब्रह्मालाच जात नाहीं, असें समजणें युक्त होय. (**समाधान**-)=नाहीं, असें होत नाहीं. कारण विद्येच्या योगानेंच सर्व प्रतिबंधांचा क्षय होतो. मोक्षाला केवल अविद्येचाच प्रतिबंध असतो. दुसरा नसतो. कारण मोक्ष नित्य व आत्मभूत आहे.

**भाष्यं—तस्मात्स यः कश्चिद्ध वै लोके तत्परमं ब्रह्म वेद साक्षादहमेवास्मीति स नान्यां गतिं गच्छति। देवैरपि तस्य ब्रह्मप्राप्तिं प्रति विघ्नो न शक्यते कर्तुम्। आत्मा ह्येषां स भवति। तस्माद्ब्रह्मविद्वान्ब्रह्मैव भवति। किं च नास्य विदुषोऽब्रह्मवित्कुले भवति। किं च तरति शोकमनेकेष्टवैकल्यनिमित्तं मानसं संतापं जीवन्नेवातिक्रान्तो भवति। तरति पाप्मानं धर्माधर्माख्यं गुहाग्रन्थिभ्योहृदयाविद्याग्रन्थिभ्यो विमुक्तः सन्नमृतो भवतीत्युक्तमेव भिद्यते हृदयग्रन्थिरित्यादि॥९॥**

**भाष्यार्थ**—यास्तव '**सः यः**०'—जो कोणी या लोकीं त्या परम ब्रह्माला साक्षात् 'मीच तें आहें' अशा प्रकारें जाणतो तो अन्य गतीस जात नाहीं. देवहि त्याच्या ब्रह्मप्राप्तीस विघ्न करूं शकत नाहींत. कारण तो त्यांचा आत्मा होतो. तस्मात् 'ब्रह्मज्ञ ब्रह्मच होतो.' शिवाय '**अस्य कुले**०'—या विद्वानाच्या कुलांत अब्रह्मवेत्ता होत नाहीं. त्याचप्रमाणें '**शोकं तरति**'—तो शोकास तरतो. म्हणजे जिवंत असतांनाच अनेक इष्ट वस्तूंचा वियोग होणें, त्यांचा क्षय होणें, या निमित्तानें होणाऱ्या मानस संतापाचें उल्लंघन करून जातो. '**पाप्मानं तरति**'—धर्म व अधर्म या नांवाच्या पापास तरतो. '**गुहाग्रन्थिभ्यः**०'—हृदयस्थ अविद्याग्रंथींपासून सर्वथा मुक्त होऊन अमृत होतो. हें सर्व 'भिद्यते हृदयग्रन्थिः०' मुं. २.२.८. इत्यादि मंत्रांत सांगितलेलेंच आहे.९.

**श्रुतिः—तदेतदृचाऽभ्युक्तम्—क्रियावन्तः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत एकर्षिं श्रद्धयन्तः। तेषामेवैषां ब्रह्मविद्यां वदेत शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णम्॥१०**

**अर्थ**—हेंच तत्त्व पुढील ऋचेनें सांगितलें आहे.—शास्त्रोक्त कर्म करणारे, श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ, स्वतः एकर्षि-नांवाच्या अग्नीचें हवन करणारे, व श्रद्धावान् असे जे अधिकारी असतील **व** ज्यांनीं यथाविधि शिरोव्रत केलें असेल त्यांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी १०.

**भाष्यं—अथेदानीं ब्रह्मविद्यासंप्रदानविध्युपप्रदर्शनेनोपसंहारः क्रियते। तदेतद्विद्यासंप्रदानविधानमृचा मन्त्रेणाभ्युक्तमभिप्रकाशितम्। क्रियावन्तो यथोक्तकर्मानुष्ठानयुक्ताः। श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठा अपरस्मिन्ब्रह्मण्यभियुक्ताः परब्रह्म बुभुत्सवः स्वयमेकर्षिमेकर्षिनामानमग्निं जुह्वते जुह्वति श्रद्धयन्तः श्रद्दधानाः सन्तो**

**ये तेषामेव संस्कृतात्मनां पात्रभूतानामेतां ब्रह्मविद्यां वदेत ब्रूयाच्छिरोव्रतं शिरस्यग्निधारणलक्षणम् । यथाऽऽथर्वणानां वेदव्रतं प्रसिद्धम् । यैस्तु यैश्च तच्चीर्णं विधिवद्यथाविधानं तेषामेव च ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**—आतां ब्रह्मविद्यासंप्रदानविधि प्रदर्शित करून उपसंहार केला जात आहे.—'**तत् एतत् ऋचा०**'—तें हें विद्यासंप्रदानविधान मंत्रानें सर्व प्रकारें प्रकाशित केलें आहे. '**क्रियावन्तः**—जसें सांगितलें आहे तशा कर्मानुष्ठानानें युक्त, '**श्रोत्रियाः**'—वेदाध्यायी, '**ब्रह्मनिष्ठाः**'—अपर ब्रह्मामध्यें निष्णात—अपर व पर ब्रह्मास जाणण्याची इच्छा करणारे व जे मोठे 'श्रद्धावान् होऊन स्वत: एकर्षिनामक अग्नीचें हवन करितात' '**तेषां०**'—त्याच संस्कृतचित्त पात्रभूत विद्यार्थ्यांस ही ब्रह्मविद्या सांगावी. '**शिरोव्रतं०**'—जसें आथर्वणांचें वेदव्रत प्रसिद्ध आहे त्याप्रमाणें मस्तकावर अग्नि धारण करणें, या लक्षणाचें शिरोव्रत ज्यांनीं यथाशास्त्र आचरिलें असेल त्यांनाच ही विद्या सांगावी. ( या ग्रंथाच्या द्वारा विद्यासंप्रदान कर्तव्य असतां, आथर्वणिकांकरितांच हा विधि आहे, असें प्रकृताचा परामर्श करणाऱ्या 'एतां म्हणजे या' या शब्दावरून ज्ञात होतें. ग्रंथाच्या द्वारा विद्येचें प्रकृतत्व संभवत असल्यामुळें सर्वत्र ब्रह्मविद्यासंप्रदान करूं नये. तर ज्यांनीं शिरोव्रत केलें आहे त्यांनाच ती द्यावी, असें येथें सुचविलें आहे. ) १०.

**श्रुतिः—तदेतत्सत्यमृषिरङ्गिराः पुरोवाच नैतदचीर्णव्रतोऽधीते ।**
**नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥ ११ ॥**

इति तृतीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

ॐ भद्रं कर्णेभिरिति शान्तिः ॥

इत्यथर्ववेदीया मुण्डकोपनिषत्समाप्ता ॥

**अर्थ**—अंगिरा ऋषि तें हें सत्य अक्षर पूर्वी शौनकाला सांगता झाला. ज्यानें शिरोव्रत केलेलें नसतें तो याचें अध्ययन करीत नाहीं. परम ऋषींना नमस्कार असो. ११

**भाष्यं—तदेतदक्षरं पुरुषं सत्यमृषिरङ्गिरा नाम पुरा पूर्वं शौनकाय विधिवदुपसन्नाय पृष्टवत उवाच । तद्वदन्योऽपि तथैव श्रेयोर्थिने मुमुक्षवे मोक्षार्थं विधिवदुपसन्नाय ब्रूयादित्यर्थः । नैतद्ग्रन्थरूपमचीर्णव्रतोऽचरितव्रतोऽप्यधीते न पठति । चीर्णव्रतस्य हि विद्या फलाय संस्कृता भवतीति । समाप्ता ब्रह्मविद्या । सा येभ्यो ब्रह्मादिभ्यः पारम्पर्यक्रमेण संप्राप्ता तेभ्यो नमः परम-**

ऋषिभ्यः परमं ब्रह्म साक्षाद्दृष्टवन्तो ये ब्रह्मादयोऽवगतवन्तश्च ते परमर्षय-स्तेभ्यो भूयोऽपि नमः । द्विर्वचनमत्यादरार्थं मुण्डकसमाप्त्यर्थं च ॥ ११ ॥

इति तृतीयमुण्डकोपनिषद्भाष्ये द्वितीयः खण्डः ॥ २

इति श्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजकाचार्यस्य श्रीमच्छंकर-भगवतः कृतावाथर्वणमुण्डकोपनिषद्भाष्यं समाप्तम् ॥

**भाष्यार्थ**—'**तदेतत्०**'—तें हें प्रकृत अक्षर—पुरुष—सत्य पूर्वी आंगिरा नांवाचा मुनि यथाविधि उपसन्न झालेल्या, शिष्यभावानें समीप आलेल्या व प्रश्न करणाऱ्या शौनकास सांगता झाला. त्याचप्रमाणें दुसऱ्याहि गुरूनें शौनकाप्रमाणेंच यथाशास्त्र उप-सन्न झालेल्या व श्रेयाची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूस तें मोक्षाकरितां सांगावें, असा याचा भावार्थ. '**एतत् अचीर्णव्रतः न अधीते**'—या ग्रंथरूपाचें अध्ययन व्रताचरण न केलेलाहि कोणी करीत नाहीं. कारण ज्यानें व्रत केलें आहे, त्याचीच विद्या फलाक-रितां संस्कृत होते. येथें ब्रह्मविद्या समाप्त झाली. '**नमः०**'—ती ज्या ब्रह्मदेवादिकां-पासून परंपराक्रमानें प्राप्त झाली त्या परम ऋषींस नमस्कार असो. ज्यांनीं पर ब्रह्म साक्षात् पाहिलें व ज्यांना त्याचा बोध झाला आहे ते ब्रह्मादिकच परम ऋषी; त्यांना पुनरपि नमस्कार असो. या मंत्राच्या शेवटीं '**नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः**' असें जें दोनदा म्हटलें आहे तें परम ऋषींविषयीं अतिशय आदर व्यक्त करण्याकरितां व मुंडकसमाप्त्यर्थ आहे ११.

इति शंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत मुंडकोपनिषद्भाष्यार्थाच्या तिसऱ्या मुंडकाचें दुसरें खंड समाप्त झालें.

इति आथर्वणमुण्डकोपनिषत्समाप्ता ।

श्रीकृष्णार्पणमस्तु

---

# सुबोध संपूर्ण वेदान्तप्रस्थानत्रय.

**१. शांकरभाष्यानुसार सुबोध गीता**—[ अवतरण, मूळ श्लोक, अन्वय, सरळ व सुबोध अर्थ, स्पष्टीकरण व सिंहावलोकन, ] शरीररथ व चतुर्भुज श्रीकृष्ण यांचीं चित्रें. पृष्ठें ३९० किंमत रु. २.

**२. शांकरभाष्यानुसार सुबोध उपनिषत्संग्रह**—[ मूळ श्रुति, अन्वयार्थ, स्पष्टीकरण, प्रत्येक उपनिषदाचें सिंहावलोकन यांसह ] ईश-केन-कठ-प्रश्न-मुंडक-मांडूक्य-तैत्तिरीय-ऐतरेय-छान्दोग्य-बृहदारण्यक-कौषीतकि-श्वेताश्वतर-जाबाल—अर्थात् ब्रह्मसूत्रांत ज्यांचा विचार केला आहे, अशीं महत्त्वाचीं तेरा उपनिषदें, प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका. किं. रु. ५॥.

**३. शांकरभाष्यानुसार सुबोध ब्रह्मसूत्र**—[ वैय्यासिक न्यायमालेसह ] प्रत्येक अधिकरणाचें नांव—सूत्रें—सूत्रार्थ—विषय—संशय—पूर्वपक्ष—संगति—सिद्धान्त, वैय्यासिक-न्यायमालेचे श्लोक—अन्वयार्थ—प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका यांसह पृ.५३० किं. ३.

**४. सुबोध पंचदशी**—[ मूळ—अन्वयार्थ—स्पष्टीकरण प्रत्येक प्रकरणाचा मथितार्थ प्रस्तावना—सविस्तर अनुक्रमणिका. सर विठ्ठलदास ठाकरसी यांचें चरित्र यांसह ] पृ. ७५० किंमत पातळ प्रत ३॥ रु. जाड प्रत रु. ४.

**५. श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ**—मूळ श्लोक, अन्वयार्थ, शांकरभाष्यार्थ, त्याचा सरळ व सुबोध अन्वयासह अर्थ, गीतारहस्यपरीक्षणात्मक विस्तृत टीपा, प्रस्तावना, सविस्तर विषयानुक्रमणिका, वादग्रस्त व अनेकार्थी शब्दांचा कोश, १ श्रीशंकराचार्य, २ शरीररूपी रथ, ३ चतुर्भुज श्रीकृष्ण अशीं तीन सुंदर चित्रें व ४ सर विठ्ठलदास दा. ठाकरसी यांचा फोटो, यांसह. पृष्ठें १३४०; जाड कागदाची दोन भागांत बांधलेली प्रत—लायब्ररी एडिशन—किंमत रुपये १०, पातळ पण उत्तम ग्लेज कागदाची एका भागांत उत्तम बाइंडिंगची प्रत किं. रु. ७॥.

**६. दशोपनिषद्भाष्यार्थ**—ईश॥८६, केन ॥८, काठक॥१२, प्रश्न॥१० मुंडक॥८, गौडपादीय कारिकांसह मांडूक्य २॥ रु., तैत्तिरीय १॥, ऐतरेय १॥, छान्दोग्य ४॥, बृहदारण्यक ७॥, या दहा उपनिषदांचा—मूळ श्रुति, अर्थ, शांकरभाष्य व त्याचा सरळ स्पष्टीकरणासह अर्थ, यांसह—सेट एकदम घेणारांस ट. ख. सह २० रु.

# ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ.

## अध्याय १ ला. भाग १ ला.

[ मूळ सूत्र, सूत्रार्थ, शांकरभाष्यार्थ, चतुःसूत्रीपर्यंत रत्नप्रभा टीकेप्रमाणें भाष्यार्थाची योजना, भाष्यार्थ, पांचव्या अधिकरणापासून आनंदज्ञानांच्या टीकेच्या भाषांतरासह भाष्याचें स्पष्टीकरण व भाष्ययोजना, भामती व रत्नप्रभा टीकांतील आशय व्यक्त करणाऱ्या टीपा, प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका, आचार्य व बादरायण व्यास, यांचीं चित्रें, यांसह ] पृष्ठें ८७२ किं. ५ रु.

## अध्याय २ रा. भाग २ रा.

सदरहूप्रमाणेंच. श्रीशंकराचार्यांचें चित्र, पृ. ७२० किं. ४॥ रु.

## अध्याय ३ रा व ४ था. भाग ३ रा.

वरीलप्रमाणेंच, श्रीप्रज्ञानंदसरस्वतींचें सचरित्र छायाचित्र, पारिभाषिक कठिण शब्दांचा कोश व सूत्रसूची यांसह छापत आहे. पृष्ठें सुमारे १००० किं. ५॥ रुपये.

---

## इतर पुस्तकें.

| | |
|---|---|
| **शतश्लोकी** ( श्रीशंकराचार्यप्रणीता—सान्वयार्थविवरण ) ... | १—०—० |
| सार्थ तैत्तिरीयोपनिषद् ( शिक्षा, ब्रह्मविद्या, भृगु ) ... | ०-१०-० |
| सार्थ नारायणोपनिषद् ... ... ... ... | १-११-० |

## दर्शनमाला.

| | |
|---|---|
| १ चार्वाकदर्शनसार ( सखंडन ) ... ... ... | ०—४—० |
| २ बौद्धदर्शनसार ( सखंडन ) ... ... ... | ०—६—० |
| ३ जैनदर्शनसार ( सखंडन ) ... ... ... | ०—४—० |
| ४ श्रीरामानुजदर्शनसार ( समतभेद ) ... ... ... | ०—७—० |
| ५ श्रीपूर्णप्रज्ञदर्शनसार ( समतभेद ) ... ... ... | ०—४—० |
| ६ श्रीतर्कसंग्रहसार ... ... ... ... | ०—५—० |
| ७ श्रीवल्लभदर्शनसार ( समतभेद ) ... ... ... | ०—४—० |
| ८ श्रीमाहेश्वरदर्शनसार ( समतभेद ) ... ... ... | ०—४—६ |
| ९ जैमिनि-पाणिनिदर्शनसार ( समतभेद ) ... ... | ०—४—६ |
| १ शांकरभाष्यानुसार गीतारहस्य ... ... ... | ०—४—० |
| २ सार्थ प्रश्नोत्तरमालिका ... ... ... | ०—४—० |

सर्व पुस्तकांचा टपालखर्च निराळा.

विष्णुशास्त्री बापट.

पत्ता—२७० सदाशिवपेठ, पुणें सिटी.